## या अंकात



**पालकनीती वाचा ! वाचायला द्या ! पालकनीती घरात अशा ठिकाणी ठेवा की सहज नजरेला पडेल**

## थँक्यू क्वेस्ट !

QUEST
Freedom & Rationality

२०१६ सालातले अंक क्वेस्टच्या गटानं करायचं ठरवलं, त्यावेळची पहिली मीटिंग आठवतेय 'आम्हाला अंक काढण्याचा अजिबात अनुभव नाही, आणि आमच्याकडचे लिहिणारे लोकही अननुभवीच, शिवाय प्रमाण मराठी शुद्धलेखनाच्या बाबतीत आम्ही लक्ष नाही देऊ शकणार...' अशी काहीशी सुरुवात नीलेश निमकरांनी केली. तेव्हा आम्हालाही थोडी धाकधूक वाटली होती. मात्र पुढं त्यांनी 'एका वेळी प्रत्येकी तीन अंकांचे नियोजन तयार असेल, काही लेखमालांचा अंतर्भाव असेल आणि जवळजवळ ६-७ जण वेगवेगळ्या जबाबदाऱ्या घेतील' असं सांगितलं, तेव्हा हायसं वाटलं.

आम्हाला सर्वात महत्त्वाचं वाटलं ते म्हणजे, वाडी-वस्तीवरती काम करणाऱ्या शिक्षकांचे अस्सल अनुभव क्वेस्ट अंकातून घेऊन येऊ पाहत होते, आदिवासी पाड्यावरच्या पालकांपर्यंत अंक पोहोचवण्याची जबाबदारी घेऊ पाहत होते....

क्वेस्टच्या कामाचा आवाका मोठा, त्यांची टीम मोठी आणि व्यवस्थापन वेगळं. शिवाय संपादक मंडळी वेगवेगळ्या ठिकाणी विखुरलेली – नीलेश कधी सोनाळ्यात, कधी मुंबई, तर दिल्ली ! अनुपमा मुंबईत, प्रल्हाद 'वाडा'मध्ये, विनायक जालना, लातूर इत्यादी ठिकाणी.... सगळे आपापल्या कामात व्यग्र. यांची मोट क्वेस्टमधल्या एकमेव पुणेकर – अंजलीच्या मदतीनं बांधायची म्हणजे एक आव्हानच होतं. हळूहळू फोन-इमेलवरच्या संवादाची सवय झाली.

वर्षभर अंक वेळेवर निघत गेले, क्वेस्टच्या पूर्वनियोजनानुसार त्यांच्या अंकांमधून पुस्तकगाडी, गोष्टरंगसारख्या उपक्रमांवर आधारित लेख, ऑन द शोल्डर्स ओफ द जायंट्स ही मौलिक लेखमाला पालकनीतीत येत राहिली. क्वेस्टच्या कामाशी जोडलेल्या शाळांमधली, कामांमधली छायाचित्रं त्यानिमित्तानं पालकनीतीत दिसू लागली. एखाद्या अंकाला एखादा महत्त्वाचा लेख आणि मुख्य म्हणजे संवादकीयच राहिलेलं असायचं आणि अगदी शेवटच्या क्षणी त्यातल्या दुरुस्त्या, पानांची हलवाहलव व्हायची आणि घाई-गडबडीमुळे गॅसवर ठेवल्याची भावना येई. – विशेषत: दिवाळी अंकाच्या वेळी नियोजनानुसार गोष्टी घडेनात आणि सगळ्यांनाच स्वत:ला ताणून काम करावं लागलं... पण चांगली बाब अशी की अंक चांगला तयार झाला आणि शिक्षकी पेशाचे विविध पैलू उलगडणाऱ्या या अंकाला शिक्षक आणि इतर वाचकांनी फार चांगला प्रतिसाद दिला.

क्वेस्टसोबत केलेल्या कामामधून नवीन माणसं जोडली गेलीयत आणि कमला निंबकर बालभवनच्या निमित्तानं वाढलेला पालकनीती परिवार अधिक मोठा झालाय... थँक्यू क्वेस्ट !

**पा ल क नी ती**
पालकत्वाला वाहिलेले मासिक





**जानेवारी ते डिसेंबर २०१७ साठी**
**वर्गणी रु.२५०**

वर्गणीचा चेक / ड्राफ्ट 'पालकनीती परिवार' या नावाने काढावा.

**संपर्क :**
**पालकनीती परिवार,**
अमृता क्लिनीक,
संभाजीपूल कोपरा,
कर्वे रस्ता, पुणे ४११००४
palakneeti@gmail.com
www.palakneeti.org

पालकनीती परिवाराचे प्रकाशन
वर्ष १६ - अंक १०
१६ जानेवारी २०१७

लेखांत व्यक्त झालेली मते लेखकांची व्यक्तिगत समजावीत.

संपादक, मुद्रक, प्रकाशक व मालक - डॉ. संजीवनी कुलकर्णी यांनी पालकनीती परिवार करिता ग्रीन ग्राफीक्स, सी-१०२, सुनिता अपार्टमेंट, १४१७ कसबा पेठ, पुणे-४११०११ येथे छापून घेऊन अमृता क्लिनिक, संभाजी पूल कोपरा, कर्वे रस्ता, पुणे-४११००४, येथे प्रकाशित केले.

या नियतकालिकास महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान प्राप्त झाले आहे परंतु या नियतकालिकात प्रसिद्ध झालेली मते महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास मान्य असतीलच असे नाही.

# संवादकीय . . .

गेल्या दोन वर्षांच्या प्रगत शिक्षणसंस्था आणि क्वेस्ट यांच्या पुढाकारानं प्रकाशित झालेल्या अंकांनंतर या २०१७ साली पालकनीतीचे अंक एक आणखी वेगळं वळण घेणार आहेत. या वर्षीचा प्रत्येक अंक शिक्षण, पालकत्व या विषयांमध्ये काम करणाऱ्या विविध संस्थांना सलाम करणारा असेल. अनेकदा आपल्याला संस्थांबद्दल काही प्रमाणात माहीत असतं, पण त्या पलीकडे जाऊन संस्थांबद्दलचा एक विश्वासार्ह, शक्य तितका समावेशक आणि साक्षेपी वृत्तांत प्रत्येक अंकातून वाचकांसमोर ठेवला जाईल. त्याचा वाचकांना तसंच त्या संस्थांनाही अनेक प्रकारे उपयोग होऊ शकेल. संवादमाध्यम म्हणून पालकनीतीची तशी इच्छा आणि जबाबदारीही आहे.

हा पहिला सलाम गांधीजींनी दाखवलेल्या वाटेनं मात्र वास्तवाची आव्हानं पेलत नावारूपाला आलेल्या आनंदनिकेतन या शाळेला. नयी तालीमनं सुरू केलेली शाळा १९७४ मध्ये बंद झाली. त्याच बुनियादी विद्यालयाची ही २००५ मध्ये नव्याने झालेली सुरवात आहे. त्याचे नाव आनंद निकेतन देण्याचं एक कारण होतं त्यावेळी शाळेची जबाबदारी घेणाऱ्या आशादेवी आणि आर्यनायकमजी यांच्या मुलाच्या आनंदच्या स्मृतीनिमित्त शाळेच्या वसतीगृहाला आनंद निकेतन असं नाव दिलं होतं. तेच नाव ह्या नव्या शाळेनं पुढं चालवलं. आनंदाचं घर या अर्थी हे नाव सार्थ ठरतं. आमच्या मते आनंदनिकेतन हा एक शब्द असायला हवा, मात्र विद्यालयाने आपले नाव आनंद निकेतन असे मानलेले असल्याने आम्हीही ते तसेच वापरत आहोत.

आनंद निकेतन मधील साथींना पालकनीतीच्या मनातली कल्पना समजल्यावर त्यांनी अतिशय आनंदानं प्रतिसाद दिला. त्या निमित्तानं नयी तालीमच्या विचारवैभवाचाही परिचय महाराष्ट्रात नव्या पिढीतील बऱ्याच लोकांना होण्याची शक्यता निर्माण झाली. हे नुसते तात्विक विचार नाहीत तर गेल्या - बारा वर्षांचा सबल आणि आश्वासक अनुभव त्यामागे आहे. शिक्षणविचारांचा एकंदरीनं विसर पडलेल्या काळात ते सगळ्यांसमोर मांडण्याची ही संधी त्यांना महत्त्वाची वाटली. दुसरं, त्यानिमित्तानं आनंद निकेतनबद्दल कुठं कुठं लिहिलं गेलेलं असलं तरी एक साद्यंत मांडणी होण्याची गरज त्यांना वाटत होतीच. या निमित्ताने नियोजित वेळात ते साधता येणार होतं.

वेळ तसा कमीच होता, शिवाय बहुतेक शिक्षकांनी यापूर्वी कधीही वर्तमानपत्रात किंवा मासिकांसाठी लेखन केलं नव्हतं. मात्र मुख्याध्यापकांनी ही कल्पना मांडल्यावर सर्व शिक्षकांना ती आवडली आणि दैनंदिन काम करीत असताना विशेष वेळ काढून त्यांनी लेखन पूर्ण केलं; प्रसंगी काहींना वैयक्तिक दु:ख अडचणी बाजूला ठेवून हे काम करावं लागलं, तेही त्यांनी केलं. मुख्याध्यापकबाईंना तर आम्ही हे पाठवा, ते पाठवा म्हणून भंडावून सोडत असू. तेही त्यांनी आनंदानं मानून घेतलं. मुलांचाही सहभाग या अंकात आहे. मुलं सहजपणे लिहितातच, पण विशेष असं की कॉम्प्युटरच्या तासिकेत मुलांनी गुगल इनपुट टूल वापरून आपलं लेखन टाईपही करून पाठवलं.

अंकाचा यावेळचा हा प्रवास नेहमीपेक्षा बराच वेगळा तर होताच, तरीही फार आनंददायी होता.

पालकनीतीच्या एरवीच्या मानानं अंकाला बाळसं आलेलं आहे. छायाचित्रं, मुलांचं लेखन, चित्रं यामुळे रंगतही वाढलेली आहे. आपल्यासमोर असे अंकामागून अंक आणायची कल्पनाही आमच्यासाठी नव्या वर्षाचा उत्साह वाढवणारी आहे. आपल्यालाही तसे वाटेल अशी खात्री वाटते.

# सुरुवात करण्यापूर्वी

२००५ मध्ये आनंद निकेतनची सुरुवात झाली. आशादेवी आर्यनायकम यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त झालेल्या राष्ट्रीय संमेलनात सामाजिक व शैक्षणिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर 'नयी तालीम-गांधीजींचा शिक्षण विचार' व त्यावर आधारित कामाची आत्यंतिक गरज सर्व सहभागींनी व्यक्त केली. सेवाग्राम येथील आनंद निकेतनचा प्रयोग अनेक कारणास्तव १९७४ मध्ये बंद पडला होता; त्याच जागी नव्याने विद्यालयाची सुरुवात व्हावी ही इच्छा सर्वांनी प्रगट केली. यामुळे नयी तालीम समितीचे तत्कालीन अध्यक्ष श्री. कनकमल गांधी यांनी ही बाब मनावर घेतली. त्याच वेळेस श्री. अ. वि. जोशी व श्री. कनकमल गांधी यांच्या विनंतीवरून नयी तालीमचा इतिहास मराठीत लिहायला श्री. रमेश पानसे यांनी सुरुवात केलेली होती. त्यांनीही नयी तालीमचा प्रयोग नव्याने सुरू करण्याची गरज तीव्रतेने मांडली व आपले यासाठी पूर्ण सहकार्य असेल असेही नमूद केले. शिक्षणविषयक आस्था बाळगणाऱ्या स्थानिक व्यक्तींनाही ही गरज पटली होतीच; पण हे काम हाती घेऊन त्यात आपली पूर्ण ऊर्जा घालू इच्छिणारा चमू लाभणे महत्त्वाचे होते.

सुषमा शर्मांचा चेतना-विकास या ग्रामीण संस्थेसोबतचा १५ वर्षांचा अनुभव गाठीशी होता; पण तो प्रामुख्याने अनौपचारिक शिक्षणाचा. बालशिक्षणाचा अनुभव असलेल्या नाशिकच्या स्वाती गद्रे एक वर्षासाठी सोबत आल्या होत्या. विद्यालयासाठी जयाताई व जयश्रीताई आणि बालवाडीसाठी हुडेताई, मनीषाताई अशा सहा माणसांच्या साथीने हा प्रयोग सुरू झाला. औपचारिक विद्यालय चालविण्याचा अनुभव एकाकडेही नव्हता. सुरुवातीची दोन वर्षे ग्राममंगलचे महत्त्वपूर्ण सहकार्य लाभले.

विद्यालयाचे स्वरूप कसे असावे, कार्यपद्धती कशी असावी हे हळूहळू ठरत गेले. हे ठरवताना सेवाग्रामच्या प्रयोगाविषयीच्या साहित्याची उपलब्धता होती. पण तेव्हाचे सामाजिक वातावरण, गांधीजींच्या प्रेरणेने व देशप्रेमाने प्रेरित, उच्चशिक्षित, सक्षम व स्वयंप्रेरित कार्यकर्त्यांची मोठी फळी याची उपलब्धता आता कशी असणार? सामाजिक परिस्थिती व संस्थेची परिस्थिती या दोन्हीबाबत खूप सारे पाणी मधल्या काळात वाहून गेले होते.

१९९०च्या दशकापासून जागतिक मुक्त अर्थव्यवस्थेचे वारे वाहू लागले आणि सर्व क्षेत्रात, खाजगीकरण मोठ्या प्रमाणात होऊ लागले. शिक्षणक्षेत्रही यातून सुटले नाही. स्पर्धा / चढाओढ याने शिक्षणक्षेत्रही ग्रासले. अनिश्चिततेने असुरक्षिततेची भावना वाढली. आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या उत्पादनाच्या व्यवस्था वाढल्या, बाजार वाढला. तंत्रज्ञानाच्या विकासामुळे नवनव्या आकर्षक उत्पादनांनी बाजार अगदी फुलून गेला. संदेशवहनाच्या क्षेत्रात तर आमूलाग्र क्रांती झाली. या सगळ्या परिस्थितीचा शिक्षणक्षेत्रावरही परिणाम न झाला तरच नवल. या नव्या रचनेत, मुलांनी उत्तम शिकावे, टिकावे आणि चांगली पॅकेजेस मिळवून प्रतिष्ठेची(?) सत्तास्थाने आपल्या मुलांना प्राप्त व्हावी, त्यांना भौतिक सुखे लाभावी यासाठी पालकही झटू लागले. 'कोण पुढे जातो?' हा विचार प्रबळ झाल्यामुळे इंग्रजीतून शिक्षण घेतल्याशिवाय धडगत नाही ही जाणीव व्यवस्था देत राहिली. विज्ञान- तंत्रज्ञान, जागतिक बाजारपेठ यांच्या परिस्थितीचा रेटा इतका तीव्र होतोय की समतेसाठीचे- माणसाच्या माणूसपणास साद घालणारे शिक्षण यात पूर्णपणे हरवत चालले आहे;



प्रतिष्ठा गमावून बसले आहे. पोटाला चिमटा काढून श्रीमंतांप्रमाणे इंग्रजी माध्यमात मुलांना शिक्षण दिल्यास मुलांना आजच्या व्यवस्थेत रोजगाराची व आर्थिक सुरक्षा प्राप्त होईल ही आशा बाळगून आजचे पालक इंग्रजी माध्यमात मुलांना टाकत आहेत. शिक्षण क्षेत्रातील खाजगीकरणामुळे शाळांचेही स्तरीकरण होतेय. गरीब श्रीमंतांच्या शाळा वेगवेगळ्या होताहेत.

या संपूर्ण काळात आणखी एक प्रक्रिया सतत होत राहिली ती म्हणजे मोठ्या शहरांच्या अवतीभवती कारखानदारी / उद्योग वाढले. कारखानदारीला शासनाकडून प्रोत्साहन मिळाले, सबसिडी मिळाली, रोजगार- निर्मिती झाली. या उद्योगातील उत्पादनांना मिळणारे भाव व कृषी क्षेत्रातील उत्पादनांना मिळणारे भाव यात अफाट दरी वाढली. शहरात सत्ता व संपत्तीचे केंद्रीकरण झाले. यामुळे शेतीवर आधारीत श्रमाकडे बघण्याची नकारात्मक वृत्ती निर्माण झाली. गावातील समाजजीवनात सांस्कृतिक भकासपण/ मागासपण येत गेले आणि शहराकडे धावणाऱ्या लोकांचे लोंढे वाढले. शहरात समृद्धी वाढली अन् झोपडपट्ट्याही. शारीरिक कष्टाची / कष्टकऱ्याची किंमत कमी झाल्यामुळे हस्तोद्योग व हस्तव्यवसायातील सर्जक आनंद दुर्लक्षिले गेले; त्यांच्या कामात सुलभता, सुबकता येण्यासाठी गरजेनुरूप योग्य तंत्रयंत्रांची जोड देण्याचा विचार व आनुषंगिक संशोधन याला फारशी प्राथमिकता आमच्या राज्यव्यवस्थेत मिळू शकली नाही. आधुनिक ऊर्जेचा पर्यायी विचारही आता-आतापर्यंत प्राथमिकतेत येऊ शकला नाही. शेतीच्या आधुनिक तंत्रांनी व बाजाराने उत्पादन वाढले पण शेतकरी व त्याच्या जमिनीची दुर्दशा वाढतच गेली. उत्पादनास भाव न मिळाल्यामुळे ग्रामीण त्यांचे दारिद्र्य वाढतच राहिले. जमीन पाणी यांच्या शाश्वततेशी आपल्याही शाश्वततेचा संबंध जुळलेला आहे याचे जे गंभीर राजकीय व सामाजिक भान यायला हवे ते निर्माण करण्यात एकूणच शासन व समाज म्हणून आपण अपयशी झालो आहोत.

याही परिस्थितीत काही समाधानकारक गोष्टीही घडताहेत. कमजोर वर्गामधे हक्कांची, समतेची जाणीव निर्माण होतेय. जागतिकच नव्हे तर देशपातळीवरही लोकांच्या मानवी हक्कांना किमान वैचारिक स्तरावर मान्यता दिली जातेय; मुलांच्या हक्कांचा जाहीरनामा जागतिक स्तरावर स्वीकारला जातोय. शिक्षण हक्काचा आवाज जोर धरतोय. राष्ट्रीय स्तरावरही प्रत्येक मुलास गुणवत्तापूर्ण शिक्षण मिळण्याची गरज शासकीय स्तरावर तत्त्व म्हणून स्वीकारली गेलेली आहे. मूल कसं शिकतं यावर विपुल संशोधन होत आहे. त्यातून प्रत्येक मूल जर खरोखरच शिकावं, चांगलं उमलावं, विकसित व्हायला हवं असंल तर सर्वप्रथम त्याचा सन्मान व्हायला हवा, त्यास निर्भय वातावरणात जगता यायला हवं; बहुआयामी अनुभवांची संधी मिळावी आणि त्यास अभिव्यक्त होता यावं, ह्या कल्पना आता मूळ धरून उभ्या आहेत. २००५ चा राष्ट्रीय अभ्यासक्रमाचा आराखडा हा या दिशेने आपण टाकलेले महत्त्वपूर्ण पाऊल आहे. मात्र वैचारिक स्तरावर पटणाऱ्या योग्य वाटणाऱ्या गोष्टी प्रत्यक्षात आणणं हे आपल्या सर्वांपुढील आव्हान आजही कायम आहे.

## आज 'नयी तालीम'समोर असलेले काम

प्रदीप दासगुप्ता, मंत्री,
अखिल भारतीय नयी तालीम समिती , सेवाग्राम

मेरी नई तालीम की व्याख्या यह है कि जिसको नई तालीम मिली है उसे गद्दीपर बिठाओगे तो फूलेगा नही और झाडू दोगे तो वह शरमायेगा नही। उसके लिए दोनों काम एक ही कीमत के होंगे। उसके जीवन में मौज मस्ती को तो स्थान मिल ही नही सकता। उसकी एक भी क्रिया अनुपयोगी और अनुत्पादक नही होगी। नई तालीम का विद्यार्थी बुद्धू तो रह ही नही सकता। क्योंकी उसके प्रत्येक अंग को काम मिलेगा। उसकी बुद्धि और उसके हाथ दोनों साथ साथ काम करेंगे। जब लोग हाथ से काम करेंगे तो बेकारी और भुखमरी का प्रश्न ही नही उठेगा। मेरी नई तालीम और ग्रामोद्योग एक ही सिक्के के दो पहलु है। यदि ये दोनों सफल होंगे तब ही सच्चा स्वराज आएगा ।

– महात्मा गांधी

नयी तालीमची उद्दिष्टे परिणामकारकपणे प्रत्यक्षात आणण्यासाठी २०१२ मध्ये झालेल्या संमेलनात चार समित्या स्थापन केल्या गेल्या.

१. अभ्यासक्रम समिती - सर्व पातळ्यांवरील अभ्यासक्रम ठरविण्यासाठी

२. प्रचार आणि प्रसार समिती नयी तालीमच्या उद्दिष्टांबद्दल समाजात जाणीव निर्माण व्हावी, ही पद्धत लोकप्रिय व्हावी, हा अभ्यासक्रम लोकांना मान्य व्हावा यासाठी,

३. भाईचारा समिती एकाच ध्येयाने काम करणाऱ्या समविचारी लोकांचा व्यापक समूह तयार व्हावा यासाठी,

४. संघर्ष समिती या कामात येणाऱ्या सर्व अडचणींवर मात करण्यासाठी.

नयी तालीम समितीतर्फे सध्या चालू असलेले काम पुढीलप्रमाणे-

१. या वेळेपर्यंत आनंद निकेतन प्रायोगिक शाळा म्हणून पुन्हा सुरू करण्यात आलेली आहे. नयी तालीम पद्धत अंगीकारून, चालू शिक्षणव्यवस्थेच्या चौकटीत ही शाळा काम करत आहे.

२. गुणवत्तापूर्ण सार्थक शिक्षा अभियान या नावाने २०१४ मध्ये एक मोहिम सुरू झाली. शिक्षकांच्या क्षमता वाढवणे आणि आनंद निकेतन हे प्रारूप म्हणून समाजापर्यंत नेणे हे या अभियानाचे ध्येय आहे.

३. ही मोहीम राबवण्यासाठी DIET सह काही शाळा निवडल्या. सरकारी आणि गैरसरकारी संस्थांनी हातात हात घालून काम करावे असे त्यामागचे गृहीत आहे. सध्या ऊखएढ आणि गुणवत्तापूर्ण सार्थक शिक्षा अभियान यांचे काम एकत्रितपणे चालू आहे.

४. शिक्षकांना नियमित प्रशिक्षण दिले जाते. यात विषयशिक्षणाचा आणि बागकामासारख्या उत्पादक कामाचाही अंतर्भाव आहे.

५. संविधानातील मूल्ये उदा. श्रमप्रतिष्ठा, स्त्री-पुरुष समता पूर्णपणे समजावीत यासाठी हे प्रयत्न केले जातात. ही मूल्ये आता व्यवहारात आणण्याची गरज आहे.

# प्रसिद्ध शिक्षणकारणी कृष्णकुमार म्हणतात...

**टीचर प्लस (१ डिसेंबर २०१५) या पत्रिकेतून साभार अनुवाद :**

शिक्षणविचारांच्या अनेक मार्गांपैकी नेमकी वाट गांधीजींना गवसली होती असा विश्वास आपल्याला असेल तर, गांधीजींच्या त्या विचारमार्गाचं सर्व बाजूंनी निरीक्षण करून त्याचा खरा अर्थ आपण समजावून घ्यायला हवा. तसं न करता आपण जर त्याचा नुसता शाब्दिक अर्थ घेतला तर आपण गांधीवाद नावाच्या पोथीनिष्ठ संघर्षात अडकून राहू. गांधीजी असल्यापासून अनेकजण त्यात अडकलेले आहेतही.

(...)

हस्तकृतीकेंद्रित शिक्षण आणि गांधींचा समग्र जीवनविचार या दोन बाजू जर आपण जोडल्या तर एक संपूर्ण अभ्यासक्रम उभारण्याकडे आपल्याला येता येईल. आधी हस्तकृतींकडे बघू. 'अनुभव घेतल्यानं मिळणारं समाधान' हेच यामागचं गमक आहे. आपल्या हातानं केलेल्या गोष्टीला इतर कोणाच्या प्रमाणपत्राची, किंवा स्तुतीची फारशी गरज नसते. आपण स्वतःच तिचा संपूर्ण आनंद घेऊ शकतो. तुम्ही हातांनी काहीतरी करून बघा म्हणजे मी काय म्हणतो ते तुम्हाला कळेल. कागद, कात्री, डिंक इ. वापरून एखादं साधं पाकीट तुम्ही करून पहा. ते कसंही वेडंवाकडं झालं तरी ते करून बघण्याच्या अनुभवाचा तुमचा आत्मविश्वास, तुमची हातोटी, कल्पकता, छोट्या गोष्टींमधून मजा घेण्याची क्षमता या सर्वांवर मोठा परिणाम होतो. लहानपणी तर हा परिणाम सर्वाधिक होत असतो. हातांनी खूप गोष्टी तयार करणारी मुलं जास्त व्यवस्थित आणि धीट होतात, हे कोणाही शिक्षकाला बघता येईल. अशा छोट्या गोष्टी तयार करत राहिल्यानं काटेकोरपणानं काम करण्याची एक सवय होते, ती पुढं कुठल्याही कामात दिसून येते.

आता दुसरी बाजू बघूया, 'गांधीजींची जीवनशैली आणि प्रत्येक गोष्ट सर्वांगानं निरखण्याची त्यांची वृत्ती. सेवाग्राममध्ये राहात असतानाची त्यांची दिनचर्या बघितली तरी दिसेल की दिवसभरातली प्रत्येक गोष्ट ते सारख्याच गंभीरपणानं करत. मग ते कोणाला पत्र लिहायचं असो, जेवण असो, पाहुण्यांना भेटणं असो, किंवा फिरायला जाणं असो. गांधीजी सर्वच गोष्टी अतिशय उल्हासानं आणि अगत्यानं करत. जीवनातल्या प्रत्येक गोष्टीविषयी त्यांच्या मनात एक व्यापक कुतूहल असे त्यातूनच ही समग्रतेची अद्भुत संकल्पना अभिव्यक्त होते. शिक्षणाचं एक प्रमुख तत्त्व यातून आपल्यासमोर ठाकतं. एखादी गोष्ट निगुतीनं मनापासून करणं आणि त्याचा संदर्भ जीवनाच्या सर्वांगानं अनुभवणं ह्याला नाव द्यायचं तर आपल्याला हवं ते देऊ शकतो. काही त्याला समग्र दृष्टीकोण म्हणतील तर काहींना ती पर्यावरणीय सजगता वाटेल. मुळात मुद्दा काय आहे, जीवनातल्या 'कोणत्याही गोष्टीचं महत्त्व कमी किंवा जास्त नसतं.' आपली मुलं जर आत्मनिर्भर आणि आनंदी व्हावीत असं वाटत असेल तर जीवनातल्या प्रत्येक गोष्टीची जबाबदारीनं काटेकोर निगराणी करण्याची आणि जबाबदारी घेण्याची संधी त्यांना अनेकवार मिळायला हवी.

(...)

अजून एक उदाहरण घेऊ. बहुतांश शाळा बागकाम हा विषय विज्ञानात किंवा परिसर अभ्यासात न घेता अभ्यासक्रमाच्या व्यतिरिक्त एक उपक्रम म्हणून बघतात. २०१५ साली 'नायला कोएलो'नं Tending a Schoolyard Garden नावाचं एक खूप सुंदर पुस्तक लिहिलं आहे. हे पुस्तक इतकं सार्वत्रिक परिणामकारक ठरलं आहे की बागकामाला विज्ञान आणि परिसर अभ्यास या विषयाच्या अंतर्गत मुख्य अभ्यासक्रमात स्थान दिलं गेलं. अखेर नावं कुठलीही द्यावीत, किंवा कुठल्याही विषयाला जोडावं, शिक्षणाच्या वाटेवर बागकाम करता येणं महत्त्वाचं. तुम्ही एखाद्या शाळेचे मुख्याध्यापक किंवा प्राथमिक विभागाचे प्रमुख असाल आणि तुमच्या शाळेकडे अगदी छोटासा जरी जमिनीचा तुकडा असेल तरी त्यावर बाग उभारण्यासाठी कोएलोंच्या पुस्तकात तुम्हाला उत्तम तपशीलवार मार्गदर्शन मिळेल.

त्याशिवायही शिकण्याचा दुसरा एक मार्ग आहे. तुमच्या शिक्षकांना तुम्ही सेवाग्रामला (जि. वर्धा, महाराष्ट्र) आनंद निकेतन शाळेमध्ये पाठवा. तिथं बागकाम हे एक शास्त्र म्हणून शिकवलं जातं. गांधीजींनी ही शाळा सुरू केली. मार्जोरी साईक्स आणि देवीप्रसाद हा दोघांनीही एके काळी ह्या शाळेत शिकवलं आहे. काही वर्षांपूर्वी सुषमा शर्मांनी नव्या काळातील कल्पनांसह या शाळेच्या जुन्या नावारूपाला पुन्हा उंचावलं आहे. विज्ञान आणि परिसर अभ्यास शिकण्यामध्ये मुलांना बागकाम केलं असण्याचे किती फायदे होतात हे मी स्वतः पाहिलं आहे. आनंद निकेतनची मुलं बागकाम करताकरता झाडं, पिकं, माती आणि पाणीसिंचन, फुलपाखरं आणि किडे, ऋतू आणि वातावरण अशा अनेक गोष्टींविषयी पाठ्यपुस्तकाच्या पार बाहेर जाऊन सगळं समजावून घेतात. पाठ्यपुस्तकाशी मर्यादित राहत नाहीत.

शिक्षण तुकड्यातुकड्यांनी कधीच होत नाही, ते एकसंधपणे मनात उगवावं लागतं हे ज्या शिक्षकांना कळतं त्यांनाच गांधीजींची शिक्षणपद्धती कळली असं म्हणता येईल. सामाजिक आणि राजकीय नेतृत्वाची जबाबदारी असल्यानं गांधीजींच्या विचारांमध्ये कल्पना, व्यक्ती, संधीसुविधा यांचा कल्पक मेळ दिसतो. दुसऱ्याला दाखवण्यासाठी कुठलंही काम करायची त्यांची पद्धत कधीच नव्हती, करायचं ते स्वत:साठीच, त्यामुळे ते अगदी शांत आरामात असत. त्यांच्या कल्पना प्रत्यक्षात आलेल्या दिसल्या की लोकांना त्या एकदम भव्य दिव्य वगैरे वाटत, पण स्वतः गांधीजींच्या मते त्या अगदी साध्यासुध्या दैनंदिन बाबी असत. मात्र आपण सर्वोत्तम तेच करत आहोत हे स्वत:ला पटलेलं असण्याची शाश्वती असणं त्यांच्या मते सर्वात आवश्यक असे.

• • •

# आनंद निकेतनच्या धारणा आणि धोरणे

सुषमा शर्मा

**स्वा**तंत्र्य, समता, न्याय आणि बंधुता या मूल्यांच्या आधारे आपण भारतीय समाजाच्या जडणघडणीचे जे स्वप्न पाहिले ते स्वप्न प्रत्यक्षात येण्यासाठी केवळ शिक्षणक्षेत्राचा विचार करणे निश्चितच पुरेसे नाही, पण शिक्षण हे समता आणण्याचे, नवा माणूस घडण्याचे खूप महत्त्वाचे माध्यम आहे एवढे मात्र निश्चित. व्यापक सामाजिक रचनांचा वेध घेत शिक्षणक्षेत्रात काम करत आपण आपला खारीचा वाटा उचलावा व आपल्याही आयुष्याला अर्थ यावा या भावनेने या छोट्याशा विद्यालयाची नव्याने सुरुवात झाली.

नयी तालीम हा शिक्षणविचार एका बाजूला मानवी संबंधातील मंगलता व सुंदरतेचा विचार करतो तसाच हा माणूस सृष्टीच्या ताण्याबाण्याचा एक धागा आहे आणि त्याचा निसर्गातील इतर घटकांशी मालकीहक्काचा नाही तर जैविक नात्याचा संबंध आहे. माणसातील सदसद्विवेकबुद्धीवर, मूलभूत चांगुलपणावर हा विचार विश्वास ठेवतो. ऐहिक जीवनाच्या पल्याड नेत नाही तर अवतीभवतीच्या वास्तवातल्या सौंदर्याचे दर्शन घडवतो. मानवी जीवनाचे श्रेयस केवळ उपभोगापुरते मर्यादित न ठेवता मनाच्या स्तरावरची सार्थकता त्यातून अनुभवता येते.

उद्घाटनाच्या वेळेसच आदरणीय श्री नारायणभाई देसाई आशीर्वचन देताना म्हणाले होते, ‘ नयी तालीम ही जीवनदृष्टी आहे आणि कलाही; केवळ तंत्र नाही. तंत्रात अडकून तिच्या मंत्राचा (तत्त्वाचा) विसर पडू देऊ नका. ‘उत्पादक काम व त्याद्वारे शिक्षण हे नयी तालीमसाठी महत्त्वाचे आहेच पण या इतकेच समाजाचे भान, सुंदरतेचे मूल्यही विसरू नका’. विविध भूमिकांमधून सहभागी होणाऱ्या प्रत्येकास व्यवस्थापन, मुख्याध्यापक, शिक्षक व विद्यार्थी या सर्वांना जोपर्यंत प्रीती, मुक्ती आणि अभिव्यक्तीचा सहजानुभव येत नाही तोपर्यंत नयी तालीम साध्य झाली असे म्हणता येणार नाही हेही त्यांनी ध्यानात आणून दिले.

विद्यालय सुरू झाले तेव्हाची संस्थेची स्थिती व शक्ती लक्षात घेऊन विद्यालयाचे स्वरूप ‘शेजारशाळा’ म्हणजे परिसरातील मुलांसाठी शाळा त्यांना तिथे अग्रक्रमाने प्रवेश असे ठरले. प्राथमिक शिक्षण मोफत असावे अशी भूमिका शाळेने घेतली असली तरी प्रत्येक पालकाने आपापल्या शक्तीनुरूप किमान सहभाग द्यावा असे ठरले. अर्थात कुठल्याही विद्यार्थ्यास इच्छा असूनही पैशांच्या अभावी शाळेत शिकता येत नाही, असे होता कामा नये हा दंडकही ठरला. परिसरभाषा मराठीतूनच शिक्षण दिले जाईल हादेखील निर्णय झाला. विद्यालयास शासनाची मान्यता घ्यावी की घेऊ नये, यावरही सुरुवातीच्या काळात खूप चर्चा झाली. शासनाची मान्यता नसल्यामुळे नयी तालीमच्या सेवाग्राम येथील प्रयोगातील पूर्वीच्या विद्यार्थ्यांना पुढील शिक्षण घेण्यात बरीच अडचण आल्याचे काही नकारात्मक व्रण गावातील जुन्या लोकांकडून व्यक्त झाले होते. तेव्हाच्या काळात ‘नोकरीसाठी शिक्षण’ नको तर ‘स्वावलंबनासाठी शिक्षण’ हवे अशी भूमिका घेऊन शासनाची मान्यता घेणे; त्यांचे सर्टिफिकेट घेणे नाकारलेले होते. आता स्वतंत्र प्रजासत्ताकात आपण राहत असल्यामुळे - लोकतांत्रिक रचनेमध्ये शासनाने लोकहितासाठी काम करणे, लोकांनी आपले हित कशात आहे याचा सामूहिकतेने विचार करणे आणि आपल्या विकासासाठी सक्रिय होणे महत्त्वाचे आहे असे वाटले. यामुळे शासकीय मान्यता घेण्याचा निर्णय आम्ही घेतला. अर्थात ही मान्यता मिळणेही तेवढे सोपे नव्हते. मराठी माध्यमाच्या शाळांची महाराष्ट्रात आता गरज नाही, असे सांगून मान्यता मिळण्याची प्रक्रिया शासन स्तरावर अनेक वर्षे ताटकळत राहिली व अंतिमत: बऱ्याच प्रयत्नांनंतर/ संघर्षानंतर स्वयं-अर्थसाहाय्यित शाळा म्हणून २०१३ साली विद्यालयास मान्यता मिळाली. तोपर्यंत ते केंद्र सरकारच्या मुक्त विद्यालय कार्यक्रमांतर्गत अभ्यासकेंद्र म्हणून चालत होते. आता ते नैसर्गिक वाढीने वाढत गेले आहे, यावर्षी पहिल्यांदाच दहावीचा वर्ग परीक्षेला बसणार आहे.

### शिक्षकवृंदाची जडणघडण

अभ्यासक्रमाचा राष्ट्रीय आराखडा २००५ मध्ये व्यक्त केलेल्या तत्त्वांमुळे नयी तालीमची प्रेरणा घेऊन काम करणे सहज शक्यही होते. पण यासाठी शिक्षकवृंदामध्ये याबाबत स्पष्ट समज व आत्मविश्वास असणे खूप गरजेचे आहे असे जाणवले.

बालवाडीच्या शिक्षकांपासून दहावीच्या शिक्षकांपर्यंत, पूर्णवेळ वर्गशिक्षकांपासून अंशकालीन कला, हस्तकला, शेतीशिक्षकांपर्यंत सर्वांना या शाळेच्या उद्दिष्टांची व मूल्यांची समज असायला हवी हे साहजिकच आहे; मात्र हे घडण्यासाठी सातत्याने प्रयत्न करत राहावे लागतात, हे अनुभवाने लक्षात येत गेले. नवीन येणाऱ्या शिक्षकाकडे अपेक्षित शैक्षणिक अर्हता असली तरी प्रत्येकाच्या व्यक्तिगत कल्पना, मान्यता, मूल्यं वेगवेगळी असतात. कधी मूल्यांच्या विसंगत जाणाऱ्या परंपरांचा मनावर मोठा पगडा असतो, त्यामुळे अगदी सरळसोट चुकीच्या कृतींनाही ‘असे कां?’ हा विचारच मनात येत नाही; समजून उमजूनही एकमेकांना किंवा वडीलधाऱ्यांना ‘दुखवायचे नाही’ म्हणून न पटलेल्या गोष्टीही व्यक्ती करत राहते. काहींना विद्यालयाची मूल्ये आणि व्यक्तिगत जीवनमूल्ये यात किमान सुसंगती असायला पाहिजे असे वाटतच

नसते. अशा परिस्थितीत विद्यालयाच्या उद्दिष्टांना पुरेसा न्याय मिळू शकत नाही. यावर मार्ग काढण्यासाठी सर्व शिक्षकांचा परस्परांसोबत सातत्यपूर्ण संवाद घडण्यासाठी आठवडी दोन ते तीन तासांची बैठक घेण्याची आणि रोजचा एक तास गरजेनुरूप लहान मोठ्या गटात बसून काम करण्याची पद्धत आम्ही विकसित केली. वर्षातून ३-४ वेळा दोन अथवा तीन दिवसांच्या कार्यशाळांचे आयोजन केले जाते. यात शालेय विषयांखेरीजही अनेक विषयांवर विचारविनिमय होतो.

१. स्त्री पुरुष समता, परंपरा व स्त्रिया, मंगळसूत्र घालावे / घालू नये?
२. सण आणि स्त्रिया, स्त्री व पुरुष शिक्षकांचे विद्यालयातील सहसंबंध
३. स्त्रियांकडे बघण्याचा समाजाचा दृष्टीकोन व बलात्कार यांचा संबंध
४. जातवास्तव - इतिहास व भविष्यातील प्रयत्नांची दिशा काय असावी, गांधी - आंबेडकर आजच्या संदर्भात समजून घेणे, डॉ. यशवंत सुमंत यांच्या लेखांचे / पुस्तकाचे सामूहिक वाचन
५. डॉ. दाभोलकर, डॉ. कलबुर्गी यांच्या हत्या का झाल्या?
६. वैज्ञानिक दृष्टीकोन का महत्त्वाचा? आपल्या जीवनात अनेक परंपरांचा आपण प्रश्न न विचारता स्वीकार करतो ते योग्य आहे काय? उदा. ग्रहण, सत्यनारायणाची पूजा, पितरांना नैवेद्य घालण्यासंबंधीच्या मान्यता इ.
७. मुक्त अर्थव्यवस्था व पर्यावरणीय प्रश्न, गांधी आणि उपभोगवाद, (यासाठी 'हिंदस्वराज नवे मन्वंतर' पुस्तक वाचन, 'स्टोरी ऑफ स्टफ' सारख्या शैक्षणिक चित्रफिती बघणे व चर्चा करणे इ.)
८. गणवेश असावा का? 'खादीचा' गणवेश का? किती योग्य?
९. शेती व शेतकरी, अन्नसुरक्षा, जैवविविधता
१०. तोत्तोचान, प्रो. डॉ. कृष्णकुमार, रमेश पानसे, लीलाताई पाटील यांची पुस्तके.
११. आपली संविधानिक मूल्ये व त्या दृष्टीने लोकतांत्रिक विद्यालयाची बांधणी
१२. बालकेंद्री शिक्षण का? कसे? 'माझ्या' प्रयत्नाचे / 'आमच्या' समूहाच्या प्रयत्नाचे स्वरूप कसे असेल? शाळा कशी दिसेल? मुले स्वयंप्रेरित कशी होतील?

**शिक्षकवृंदाची जडणघडण**



याशिवाय अन्य संस्थांद्वारा आयोजित प्रशिक्षण कार्यक्रमात सहभाग, अन्य उपक्रमशील शाळांना भेटी इ. मधून शिक्षक हळूहळू घडताहेत.

शिक्षकांमधील आपसी संबंध स्नेहाचे, सहकार्याचे, पारिवारिकतेचे असावेत असा आमचा मिळून प्रयत्न असतो. आमचे शिक्षक कुठलेही काम कमी प्रतीचे मानत नाहीत. आपापल्या विषयाचे अध्यापन करत असतानाच शेती, संडास-सफाई, स्वयंपाक, वस्त्रकला, स्वच्छता, खतनिर्मिती यासारखी कामे तसेच सणउत्सवांचे नियोजन, तयारी, प्रत्यक्ष कार्यक्रम व अंतिम आवराआवरीही नियोजनपूर्वक करतात.

**शिक्षणक्रम :**

महाराष्ट्र शासनाचा अभ्यासक्रम 'नयी तालीम'ची दृष्टी बाळगून प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न आम्ही करतोय. हे करत असताना कुठल्याही साधारण आकाराच्या गावाला 'आपल्या मुलांचे शिक्षण कसे करावे' याबाबत विचार करून तो प्रत्यक्षात आणता यावा ही दृष्टीही बाळगलेली आहे. एका वर्गात साधारणपणे २५ ते ३० हून अधिक मुले असू नयेत असा इथला नियम आहे. Three "H' (head, heart and hands)चे भान ठेवत असताना 'उत्पादक कामांद्वारे शिक्षण' ही आजही शिकण्याची उत्तम पद्धती आहे, यावर आमचा विश्वास असल्याने इथे शेती, बागकाम यामधून निसर्गविज्ञान, पर्यावरण, गणित, भाषा, सामाजिक अध्ययन अशा विषयांचा अभ्यास होतो.

त्याचप्रमाणे आहारशास्त्र व पाकशास्त्र, वस्त्रकला ( कताई ते शिवणकाम) ही कामे ज्ञान बांधणी व दैनंदिन जीवनातील अनेक गोष्टींबाबत आपल्याला स्वावलंबी बनवतात असे आम्हाला वाटते. आपले छोट्याछोट्या गोष्टींसाठी अडणार नाही हा आत्मविश्वास देतात. एवढेच नव्हे तर शिक्षक व विद्यार्थी दोघेही एकत्रपणे काम करीत असल्याने ते सहजपणे एका पातळीवर येत असतात.

एखाद्या कामात विद्यार्थी शिक्षकांपेक्षाही अधिक सरस असल्याचे जाणवते, त्यामुळे दोघांच्या नात्यातील ताण एकदम कमी होतो. सोलर कुकर, सराई कुकर, गोबर गॅस इ.चा उपयोग करताना प्रकाश, उष्णता, ऊर्जा, भौतिक व रासायनिक बदल

इ.बाबत व्यावहारिक समज विकसित होते.

पेटी चरखा, अंबर चरखा, सायकल, शिवणयंत्र इ.च्या प्रत्यक्ष वापरातून यंत्रविषयक समज विकसित होण्यास मदत होते. नववी दहावीच्या स्तरावर सुतारकाम, बांबूकाम, प्लम्बिंग, इलेक्ट्रिक फिटिंग यासारख्या आणखी काही गोष्टींचा समावेश केला जाणार आहे. कम्प्युटरचा वापरही मुले चौथीपासून करायला शिकतात. इंग्रजीवर पकड येते तेव्हा इन्टरनेटच्या मदतीने आवश्यक ती माहिती मिळविण्याचे कौशल्य मुलांना येते.

विद्यालयातील नैसर्गिक संसाधनांची जपणूक करणे, पर्यावरणस्नेही पद्धतीने सण साजरे करणे, प्लास्टिकच्या दुष्परिणामांबाबत समज वाढविणे व "4 R' - Refuse, Reduce, Reuse and Recycle ही तत्त्वे दैनंदिन-जीवनात अनुसरणे यासारख्या गोष्टींना महत्त्व दिले जाते. याच प्रयत्नांचा भाग म्हणून शाळा परिसरातील दोन महत्त्वपूर्ण व मोठे अभ्यास प्रकल्प मुलांनी हाती घेतले.

१. पाणी व्यवस्थापन व पाणी संवर्धन
२. सेवाग्राम परिसरातील जैवविविधतेचा अभ्यास व तिचे महत्त्व समजून घेणे.

**सामाजिकता विकसित करणारे शिक्षण**

सामाजिकता जपणे हा विद्यालयाच्या संस्कृतीचा अविभाज्य भाग मानला जायला हवा. त्यामुळे व्यक्तीहिताचा विचार करताना सहकारी समाज असल्याशिवाय एकेकट्या व्यक्तीस जगण्यात सार्थकता व सुरक्षितताही जाणवू शकत नाही. वर्गात शिकत असताना विद्यार्थ्यांनी एकेकट्याने शिकण्यापेक्षा समूहांनी काम करण्याकडे आमचा कल असतो. मुले एकमेकांकडून अधिक सहजतेने शिकतात; ही ज्ञाननिर्मितीची प्रक्रिया समूहस्तरावर होत असते. परस्पर संवादातून ती आनंददायकही होते, त्यात विविधताही येते. मिश्र गटात एकत्रपणे कामे करण्याची संधी मिळाल्यामुळे निकोप मैत्रभाव विकसित होतो. त्यामुळे वर्गातील प्रक्रिया असो वा वर्गाबाहेरील उपक्रम, सहकाराचे तत्त्व सांभाळले जाते. मुले लहान असताना कधी जास्त भांडतात, पण शिक्षक त्यांना परस्परसंवादातून प्रश्न दूर कसे करता येतील यासाठी मदत करतात.

'स्वत:शी संवाद करण्याची, स्वत:चे निरीक्षण करण्याची सवय लहान-मोठ्या प्रत्येकाने लावून घ्यावी व स्वत:ला घडवण्याची जबाबदारी प्रथमत: आपल्यालाच घ्यावी लागते हे शिकावे' याकडे सध्या आम्ही लक्ष देत आहोत. त्यासाठी स्वविकासाचा आराखडा ठरवणे, त्यानुरूप स्वयंप्रेरणेने सक्रिय होणे आणि आपल्या प्रयत्नाचे मूल्यांकन आपणच करण्याची पद्धत मुले, शिक्षक मिळून विकसित करीत आहोत. शाळा ही सर्वांची आहे व आपण मिळून गरजेनुरूप ती घडवायची आहे, तिला आकार द्यायचा आहे, प्रत्येकाने जबाबदारीने तिला स्वच्छ व सुंदर बनवायचे आहे. विद्यालयात ज्या काही क्रीडा, कला, गायन, वादन, नृत्य, वाचनालय, प्रयोगशाळा, अभ्यास-भेटी यासारख्या संधी उपलब्ध आहेत, त्यातील आपल्याला काय आवडणारे आहे त्यांचा उपयोग करून स्वत:तील सुप्त गुणांना कसा वाव देता येईल ते शोधायचे आहे.

शाळा हा एक छोटा समाजही असतो. या समाजाचे नियम बनवणे, नियमांचे पालन करणे, आपला कारभार चालविण्यासाठी प्रतिनिधी ठरवणे, निर्णय घेणे, सगळ्यांचा सहभाग घेत काम करणे यासारख्या गोष्टीही विद्यालयात होतात. विद्यार्थी व शिक्षकांच्या मिळून समित्या तयार होतात व त्यांना विद्यालयाच्या काही जबाबदाऱ्या घ्याव्या लागतात. काही प्रश्नही सोडवावे लागतात. समाजातल्या प्रश्नांसंदर्भात मुले काही सकारात्मक पर्याय देतात. त्याची जबाबदारीही घेतात. उदा.

१. धुळवडीला लोकांनी रासायनिक रंगांचा वापर करू नये यासाठी सेवाग्राम परिसरात या रंगांविषयी पोस्टर्स व घोषणा बनवून माहिती देणे, दुष्परिणाम सांगणे आणि पर्याय म्हणून नैसर्गिक रंगांची विक्री करणे.
२. कचरा व्यवस्थापनाचा प्रकल्प सामूहिकपणे हाती घेणे; ज्यात वर्ग, शाळा, परिसर सर्वांचे व्यवस्थापन अपेक्षित आहे.

**स्वातंत्र्य व जबाबदारी : एकाच नाण्याच्या दोन बाजू :** विनोबांनी म्हटले होते की नयी तालीमचे वैशिष्ट्य तिच्या नित्यनूतनत्वात आहे. मूलतत्त्व कायम ठेवून स्थळ-काळ सापेक्ष बदल करण्यानेच शिक्षणात जिवंतपणा येतो, अर्थपूर्णता येते. हे काळाचे भान ठेवत माणसांना प्रेमाने आणि अहिंसेने जोडणारे, नवनिर्मितीस पूरक असे बदल करण्याचे स्वातंत्र्य शिक्षकांनीही घ्यायलाच हवे. विद्यार्थीही स्वत:च घडत असतो. अर्थात हे घडण्यासाठी मुळातच शिक्षक व विद्यार्थी दोघांनाही या स्वातंत्र्याचा अनुभव मिळेल अशी विद्यालयाची रचना करणे महत्त्वाचे आहे. त्या दृष्टीने काय करता येईल ह्याचा आम्ही विचार करत आहोत. साधारणपणे या वर्षभरात आपल्या वयाचे मूल काय शिकू शकते याचा आराखडा क्षमतांच्या यादीच्या रूपात मुलांसमोर द्यावा व आपल्या गतीने मुलांनी त्यानुरूप प्रयत्न करावा. सातत्यपूर्ण मूल्यमापन विद्यार्थी व शिक्षक दोघांनीही करावे व एकमेकांशी संवाद करावा. मुलांना स्वत:स घडवता यावे यामध्ये शिक्षक म्हणून आपण स्वत:वर काय काम करत आहोत याचाही विचार करावा. त्या दिशेने आपली किती वाटचाल झालेली आहे, किती करायची आहे हे एकमेकांसमोर मांडावे.

१. व्यवस्थापनाने मुले व शिक्षक यांना



प्रवास करता यावा यासाठी आवश्यक सुविधा द्याव्यात.

२. विद्यालयाची जी व्यवस्थापकीय कामे विकेंद्रितपणे करता येतील त्याप्रमाणे करावीत. उदा. शिक्षकाने सुट्टी घेण्यापूर्वी जमेतोवर आपल्या वर्गाचे इतरांच्या मदतीने नियोजन करावे. एका वेळेस दोनपेक्षा अधिक शिक्षक अनिवार्यता नसल्यास गैरहजर राहू नयेत याचे भान ठेवावे. स्वच्छता, सण- उत्सव, पाहुणे, शिकण्याशिकवण्यात येणाऱ्या अडचणी, तसेच क्रीडा, कार्यानुभव यातील अडचणींकडेही शिक्षक व विद्यार्थ्यांच्या समित्यांनी लक्ष द्यावे.

१. शिक्षकांच्या मानधनाचे स्वरूप कसे असावे याबाबतही शिक्षकसमूह व व्यवस्थापनाने मिळून विचार करावा व त्यानुरूप काम करावे.

### शिस्त व शिक्षा :

'शिस्त हवी, जबाबदारीही हवी, पण स्वेच्छेने स्वीकारलेली; लादलेली नको' ही विद्यालयाची भूमिका. शिक्षकांनी मुलांचे वेगवेगळेपण समजून घेत त्यांना समजेल, आव्हानात्मक वाटेल अशा पद्धतीने शिकवावे. प्रसंगी एखादे मूल अतिउत्तेजित होते, दंगा करते, इतरांना त्रास देते, तेव्हा कधी कधी शिक्षकांचा संयम सुटतो आणि क्वचित एखादी थप्पडही दिली जाते. आपण चुकतो हे शिक्षकाला ठाऊक असते. पण परिस्थिती हाताळण्यासाठी लागणारी कल्पकता, संयम, वर्गव्यवस्थापनाचे कौशल्य पुरेसे अवगत झालेले नसते. मात्र हे सांगायला हवे की सामान्यत: असे घडले की शिक्षकासही खूप वाईट वाटते; मुलास प्रेमाने पोटाशी धरले जाते. मुले तर खूप क्षमाशील असतात, जीव लावतात असा बहुतेकांचा अनुभव असतो. प्रत्येकाने स्वत:वर काम करत अशा घटना घडूच नयेत असा आमचा प्रयत्न आहे. मुलांना रागवायला नको हे खरेच पण त्यांच्याबद्दलची आस्था जराही कमी होता कामा नये.

कधी कधी लहान मुलांना परिपाठ पूर्णपणे कळणारा असतोच असे नाही. कधी महत्त्वाच्या दिवशी लांबतोही. अशा वेळेस काही लहान मुले गोंधळ करू लागतात. म्हणून रागावण्यापेक्षा मुलांना बाहेर जाण्यास मोकळीक दिली जाते. मुले मोठी होतात त्यानंतर आपणहून आपला अभ्यास त्यांनी करावा, अडचणी विचाराव्यात असा प्रयत्न विद्यालयाच्या स्तरावर चाललाय. योग्य शैक्षणिक साहित्य व पद्धतींचा वापर करत, मुलांच्या स्वातंत्र्याचा आदर करणारी वर्गव्यवस्थापनाची अधिक परिणामकारक कौशल्ये विकसित करणे हे आव्हान प्रत्येक शिक्षकापुढे आहे.

### मूल्यशिक्षण

मूल्यशिक्षणाचे तास घेऊन मूल्ये शिकवली जाऊ शकत नाहीत तर ती विद्यालयाच्या दैनंदिन कार्यसंस्कृतीचाच हिस्सा असावीत अशी विद्यालयाची भूमिका आहे. त्यामुळे स्वातंत्र्य, समता, बंधुता, पर्यावरणाबाबत जागरूकता, सहकार या मूल्यांच्या संदर्भात दैनंदिन व्यवहारात किमान सुसूत्रता आणण्याचा प्रयत्न होतो. तो पुरेसा समाधानकारक आहे का, यावरही प्रसंगी बालसभांमधून व शिक्षकसभांमधून चर्चा होतात. असमतेचा अनुभव कुठे व कसा येतो यावर अनेक प्रसंगी व विशेषकरून प्रजासत्ताक दिनाच्या अवतीभवतीच्या दिवसात विचार करण्याची संधी घेतली जाते. लहान मुलांसह चर्चा करताना त्यांनी रंग रूप- कपडे, लिंग, बुद्धी / हुशारी, कलागुण याआधारे घेतलेले असमतेचे अनुभव ती व्यक्त करतात.

मोठ्या मुलांच्याबाबत बोलावयाचे झाल्यास जातीव्यवस्था, वर्गव्यवस्था, धर्मभेद, स्त्री – पुरुष संबधीच्या धारणा, श्रद्धा- अंधश्रद्धा यासंबंधीही जाणिवा तयार होत असतात. हे कुठलेही विषय विद्यालयात चर्चेसाठी वर्ज्य नसतात; यावर बोलले जावे, मुलांनी अभ्यासपूर्वक आपापल्या भूमिका ठरवाव्यात, त्यासाठी वर्तमानपत्रातील लेख वाचावेत, भाषणे ऐकावीत, चर्चा करावी, प्रश्न विचारावेत, सिनेमे – छोट्या फिल्म्स बघाव्यात यासाठी विद्यालय मुलांना खास संधी निर्माण करून देते. विविध विषयांचे अभ्यासक, जागरूक नागरिक, आंदोलनातील कार्यकर्ते यांना ऐकण्याची संधी देण्यासाठी खास सोय उपलब्ध करून देते. प्रजातंत्रात लोकांनी सजग असणे, भूमिका घेणे, चुकीच्या गोष्टींचा निषेध करणे हे महत्त्वाचे असते हे दाखवण्यासाठी प्रत्यक्ष अशा प्रसंगात मुलांना घेऊन शिक्षक सहभागी होतात. निर्भयावरील दिल्लीतील अत्याचार, दाभोलकरांची हत्या, वर्धा जिल्ह्यातील अनेक शेतकऱ्यांचे पैसे चुकते न करणारा व्यापारी यासारख्या गोष्टींच्या निषेधात निघालेल्या मोर्चांमध्ये सहभागी होण्याची इच्छा असलेल्या मोठ्या वर्गातील मुलामुलींना घेऊन शिक्षक सहभागी झाले आहेत. वर्धेमध्ये किंवा आसपास होणाऱ्या भाषणांच्या कार्यक्रमांची माहिती मुलांना आवर्जून दिली जाते. तिथे जायची इच्छा असली तर सोबतही नेले जाते. अलीकडच्या काळात श्री. रमेश ओझा यांना 'गांधी आणि आंबेडकर आणि जातीव्यवस्था', श्रीमती करूणा फुटाणे यांना 'सण आणि उत्सव यांचे मनुष्याच्या जीवनात स्थान आणि त्याकडे बघण्याच्या नव्या दृष्टीची गरज', डॉ. उल्हास जाजू व श्रीमती किरण जाजू यांना 'रक्षाबंधनाचा नवा सामाजिक आशय' यासारख्या विषयावर ऐकण्याची व संवाद करण्याची संधी मुलांना मिळाली. डॉ. अभय बंग यांचे 'हिंदस्वराज: मला कळलेले', श्री आनंद करंदीकर यांचे धर्मांधतेसंबंधी, डॉ. शाम असोलेकर यांचे ' पर्यावरणस्नेही विकास आवश्यक आणि शक्यही' यासारखी भाषणे आठवी ते दहावीच्या काही मुलांनी आवर्जून ऐकली. नववीचा एक विद्यार्थी तर श्री. शाम मानव यांच्या ' मराठा क्रांती मोर्चा विषयीचे माझे आकलन' या विषयावर रात्रीचे भाषण ऐकण्यासाठी सेवाग्रामहून एकटाच वर्ध्याला आला होता.

### स्त्री पुरुष समता :

दोघांनाही समान संधी मिळायला हवी. मुलींकडे बघण्याचा सामाजिक पगडा प्रत्येकावर काही ना काही प्रमाणात असतो. त्यातून मुलीही सुटत नाहीत. कधी कधी मुलींना शिक्षकांकडून झुकते माप दिले जाते. या संदर्भात पूर्वी घडलेला एक किस्सा आठवतो. शेतीच्या शिक्षकांनी मुलींना फोर्कचा वापर करून आपली जमीन तयार करण्याबाबत थोडी सवलत दिली होती. त्या दमल्या होत्या तेव्हा शिक्षकांनी मुलींच्या वाटचे काम मुलांवर सोपवले होते. मुलांनी मदत तर केली पण आपली तक्रार सभेत नोंदवली. शिक्षकांनीही आपली चूक कबूल करताना वाचलेल्या एका अभ्यासाचा दाखला दिला- ' स्त्रिया कमी श्रमाचे काम जास्त काळ सलगपणे करू शकतात आणि पुरुष शक्तीचे काम करू शकतो पण त्यास सलग चिवटपणे काम करणे शक्य होत नाही.' हा तर्क शाळेच्या वेळापत्रकाच्या दृष्टीने मुलांना अजिबात पटला नाही. चर्चेअंती मुलींनीही आपली चूक मान्य केली व याप्रकारे अकारण सवलत घेतल्याने आपण स्वत:ला कमजोर करत असतो हे जाणले.

स्वयंपाकघरातील कामे दोघांनाही सहजतेने करता आली पाहिजेत; त्या कामाकडे व आवराआवर, भांडी घासणे ही सर्व कामे

घरात आईकडे अथवा स्त्रियांकडे देऊन घरातील पुरुष मुलगे मोकळे होतात; ही कामे करणाऱ्या घरातील स्त्रियांना कमी सन्मान मिळतो या घरातून निर्माण होणाऱ्या असमतेकडे मुलांचे लक्ष वेधले जाते. विद्यालयात स्वच्छतेच्या कामाकडेही अत्यंत महत्त्वाचे काम म्हणून पाहिले जाते. शाळेत दररोज अर्धा तास मिळून वर्ग, शाळा-परिसर, संडास व मुत्रीघर सफाईचे काम लहानमोठे सर्वजण मिळून करीत असतात.

मुलामुलींमध्ये सहज संबंध असावेत, निकोप मैत्रीचा भाव असावा यासाठी सुरुवातीपासून मिश्र गटात काम करण्याची पद्धत अवलंबलेली आहे. असे असले तरी किशोरावस्थेच्या सुरुवातीच्या काळात काही वेळेस संबंधात संकोच निर्माण होताना दिसतो. अशा वेळेस मुलांसह संवाद करून संबंधात सहजता निर्माण होण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. 'पिंक' सिनेमा बघायला संस्थेचे अध्यक्ष व शिक्षकांसह मुलेमुली जातात व त्यानंतर त्यात मांडलेल्या प्रश्नांवर चर्चाही करतात इथपर्यंत ही सहजता विकसित होताना दिसते.

**सण आणि उत्सव :**

परंपरा पूर्णपणे नाकारणे अथवा चिकित्सा न करता स्वीकारणे या दोन्हीही गोष्टी शाळेत टाळल्या जातात. सण व उत्सवांमुळे जीवनात आनंद निर्माण होतो. तोचतोपणा जाऊन एक रंगत निर्माण होते, व्यक्तीतील सर्जनशीलतेला वाव मिळतो. तसेच परंपरांमध्ये स्वार्थप्रेरित दोषही निर्माण होतात; सणांच्या नावे बाजार फोफावतात, मुद्दाम द्वेषभावनाही भडकावल्या जातात.

रक्षाबंधन, जन्माष्टमी व मकरसंक्रांती या नयी तालीममध्ये पूर्वीपासून साजऱ्या केल्या जाणाऱ्या उत्सवांमध्ये कालोचित बदल करून हे सण विद्यालयात साजरे केले जातात. ऋतुचक्रातील सुंदरता, वैशिष्ट्ये जाणून घेत मकरसंक्रांती साजरी केली जाते. थंडीच्या दिवसात उष्मा देणाऱ्या तीळगुळाच्या वड्या मुले स्वतः करतात. जन्माष्टमी साजरी करताना कृष्णाकडे ईश्वर म्हणून न बघता परंपरेतील विशेष पराक्रमी पुरुष म्हणून कृष्ण विद्यालयाला हवासा वाटतो. मोठे बांध घालून पाण्याची व्यवस्था करणारा, शेती गोपालनातून समृद्धी आणणारा, त्या दूधदुभत्याचा उपयोग गावातील मुलेबाळे, लोक यांच्या आरोग्यासाठी आधी व्हावा असा आग्रह धरणारा कृष्ण सर्वांना आवडतो. अन्य धर्मीयांचे सण मोठ्या प्रमाणावर साजरे केले नसले तरी त्या दिवशी त्या सणांची वैशिष्ट्ये, धर्माची मूळ तत्त्वे विशेष माहिती असणाऱ्या व्यक्तीस निमंत्रित करून समजून घेतली जातात. राष्ट्रीय उत्सव, थोरांचे विशेष दिनही आवर्जून साजरे केले जातात. विविध थोर पुरुषांची चरित्रे या निमित्ताने मुले शिक्षक दोघेही वाचतात, भाषणे देतात.

**पुढील आव्हाने**

बदलत्या काळास अनुरूप पण समता, न्याय, बंधुता या मूल्यांच्या आधारे शिक्षणाचा सशक्त व पारदर्शी प्रयोग म्हणून आनंद निकेतनला पुढील पाच वर्षात आकार मिळावा यासाठी अधिक निष्ठेने प्रयत्न व्हायला हवेत. मूल्यांसोबतच ज्ञानासाठी उत्सुक, जिज्ञासू, कल्पक शिक्षकवृंद अशी ओळख बनावी. पर्यावरणस्नेही वृत्तीने अनेकांना नयी तालीमची काळास अनुरूप अशी प्रेरणादायी तत्त्वे व प्रयोग प्रात्यक्षिक रूपाने बघायला मिळावेत, यासारख्या प्रयोगांपासून प्रेरणा घेऊन मूल्याधारित गुणवत्तापूर्ण व सार्थक शिक्षणाचे नवे प्रयोग उभे करण्याची इच्छा शिक्षक, पालक, संस्था, समाज अशा अनेक स्तरावर व्हावी आणि समतेसाठी शिक्षण हे आंदोलन बनावे; स्वयंप्रेरित शिक्षक, विद्यार्थी, पालक यांच्यात परस्परांविषयी विश्वासाचे दीर्घकालीन नाते आकाराला यावे. हे सर्व शक्य आहे असा विश्वास आम्हाला प्रयत्नांच्या आधारे वाटतो.

मुख्याध्यापिका,
आनंद निकेतन, वर्धा



## पालक म्हणतात...

नई तालीम तर्फे सुरू असलेली शाळा म्हणजे 'आनंद निकेतन' ही शाळा नसून गुरुकुल आहे. येथे विद्यार्थ्यांना घडविण्याचे कार्य केल्या जातो यामध्ये या शाळेच्या शिक्षकवृंदांचा सिंहाचा वाटा आहे. शाळेतील निसर्गरम्य वातावरण कृतीशील शिक्षण, बागकाम, स्वयंशासन आणि इतर सर्व शिक्षण या सर्व बाबींचा प्रभाव येथील विद्यार्थ्यांवर पडलेला दिसून येतो. खऱ्या अर्थाने आदर्श विद्यार्थी घडविण्याचे कार्य आनंद निकेतनद्वारे केल्या जाते असे माझे मत आहे.

माझा मुलगा या शाळेत वर्ग ९ पासून शिक्षण घेत आहे या शाळेत दिल्या जाणाऱ्या शिक्षणाचा त्याच्या दैनंदिन जीवनावर सुद्धा प्रभाव दिसून येतो. आनंद निकेतन मधील शिक्षकवृंद यांच्या शिक्षणशैली मुळे विद्यार्थ्यांमध्ये मनोबल वाढलेले असून काहीतरी नवीन करून दाखविण्याची जिद्द निर्माण झाली आहे. त्यामुळे आजच्या विज्ञानयुगातील शर्यतीच्या वातावरणामध्ये आनंद निकेतन येथील विद्यार्थी नेहमी पुढेच राहील यात शंका नाही. तसेच या शाळेमधून बाहेर निघणाऱ्या विद्यार्थी बहुआयामी कर्तव्यनिष्ठ संयमी व सद्गुणी घडतील कारण ही शाळा महात्मा गांधीजीच्या विचारांनी प्रेरित आहे.

**आशा अनिल लुतडे**

# पारखी नजरेतून

डॉ. लीना देशपांडे

**ही** नुसती शाळा नाही, त्याहून अधिक हे आनंदाचं घर आहे, कारण गांधीजींच्या शिक्षणविषयक तत्त्वज्ञानावरच्या अपार प्रेमातूनच ती जन्माला आलेली आहे. तिचं नावच आहे, आनंद निकेतन....

'नयी तालीम'चा वारसा लाभलेलं आनंद निकेतन, सेवाग्राम, वर्धा.

आनंद निकेतन आपल्याला रुझवेल्टच्या वाक्याची आठवण करून देतं. रुझवेल्टनं म्हटलं होतं,

The future belongs to those who believe in the beauty of their dreams.

आनंद निकेतनला ही भविष्याची वाट सापडलेली आहे, कारण इथली माणसं स्वप्नांच्या अलौकिक दुनियेत केवळ रमलेली नाहीत तर ती दुनिया प्रत्यक्षात उतरवण्याचा वसा त्यांनी घेतलेला आहे. आज अशांततेच्या वावटळीत सैरभैर झालेल्या जगाला बापूंच्या विचारांमधूनच उत्तराची वाट दिसेल हे ज्यांना उमगलेलं आहे, त्यांनी नव्या पिढीपर्यंत हा वारसा पोचवण्यासाठीच या शाळेचा पाया घातला.

महात्माजींचा कृतीप्रधान शिक्षणावर ठाम विश्वास होता. निर्मितीक्षम कामांमधूनच शिक्षण मनात साकारतं असं त्यांचं म्हणणं होतं. 'नयी तालीम'मध्ये हे साद्यंत मांडलेलंही आहे. जॉन ड्युई या जगप्रसिद्ध शिक्षणवेत्त्यानंही कृतीमार्गानं शिक्षण होण्यावरचा गाढ विश्वास प्रकट केलेला आहे. आनंद निकेतन ही शाळा किंवा हे शिक्षणकेंद्र म्हणू, या विचारांचा सक्रिय मागोवा घेतच उभं राहिलेलं आहे.

विचारांचा, संकल्पनांचा सबळ आधार असला तरी एक शाळा चालवताना अनेक आव्हानांशी सामना करावा लागतो. आपल्या कल्पनांना समजून – उचलून घेणारे शिक्षक मिळावे लागतात, पालकांचं – समाजाचं सहकार्य मिळावं लागतं. शाळा या कल्पनेला आजवरच्या शिक्षणव्यवस्थेनं इतकं खालच्या स्तरावर आणून ठेवलेलं आहे की आपल्या मनास्वप्नातली शाळा आपण खरोखरच उभारत आहोत ना, याची एकदा त्रयस्थपणानं खात्री करून घ्यावी असं आनंद निकेतन शाळेलाही वाटलं. शाळा सुरू होऊन तेव्हा आठ वर्षं झाली होती. आनंद निकेतनचं मूल्यमापन मी करावं अशी इच्छा शाळाप्रमुखांनी दाखवल्यामुळे ही शाळा आतूनबाहेरून निरखण्याची संधी मला गवसली. चार पूर्ण दिवस मी शाळेत गेले. निरीक्षणांच्या संगतवार नोंदी ठेवल्या, वर्गातलं शिकवणं बघितलं, शाळेतले उपक्रम तपासले, शिक्षकांशी चर्चा केल्या, प्रत्येक वर्गातल्या विद्यार्थ्यांशीदेखील बोलले. त्यांच्या वह्या, त्यांच्या प्रकल्पांचे अहवाल बघून घेतले. एरवीही मला ही शाळा माहीत होतीच, पण अशी साक्षेपी भेट अपेक्षेपेक्षा आपल्याला बरंच अधिक देऊन जाते. मला त्यातून गवसलेल्यापैकी शब्दात मांडता आलेलं तुमच्यासमोर ठेवते आहे. कारण मला वाटतं, संपूर्ण समाजाला शिकण्यासारखं या शाळेकडे बरंच काही आहे.

आनंद निकेतनमध्ये शिरल्यापासूनच हे वेगळेपण आपल्याला दिसतं. एरवी शाळा म्हटल्यावर आपल्या मनासमोर येईल तशी इमारत या शाळेकडे नाही. सेवाग्राम आश्रमातल्या मोकळ्या जागेभोवती असलेल्या कौलारू बैठ्या खोल्या म्हणजे आनंद निकेतन. अर्थात बापूजींच्या संकल्पनेशी हे रूप अगदी हुबेहूब जुळतं. मोठी इमारत नाही, ही शाळेची कमतरता नव्हे. शाळेच्या सगळ्या कार्यक्रमांना इथं पुरेशी चांगली जागा आहे. मुख्य म्हणजे शिक्षक आणि विद्यार्थ्यांनी निगा राखलेली असल्यानं वर्ग अगदी स्वच्छ आणि सुंदर आहेत. शाळेचं ग्रंथालय आवश्यक त्या सर्व उत्तम पुस्तकांनी सुसज्ज आहे.






पुस्तकांना वाचणाऱ्यांच्या हाताची सवय लागलेली आहे. हे काही धूळ साठलेलं ग्रंथालय नाही. अजून त्याचा वापर गरज समोर दिसली की होतो, आपणहून पुस्तकांच्या ओढीनं होत नाही, पण हीदेखील तक्रार नाही, इतके कार्यक्रम सतत सुरू असतात की असं होणं साहजिकच आहे.

ह्या शाळेचं शक्तिस्थान आहे, गांधीजींनी सांगितलेल्या कृतीवाटेनं शिकण्यावरच्या विश्वासात. इथे विज्ञानातली किंवा गणितातलीदेखील एखादी संकल्पना म्हणजे पोषण असो किंवा कीडनिवारण असो की वजने-मापे असोत, शेतात किंवा स्वयंपाकघरात काम करताकरताच विद्यार्थ्यांना शिकवली जाते. वर्गासाठी दिलेल्या शेतात स्वत: पिकवलेल्या भाजीपाल्याच्या, फळांच्या मोजमापातून आकार, वजने-मापे, नफा-तोटा असे धडे इथं शिकले शिकवले जातात. मानव आणि मानवता यांचं सक्षमीकरण हे शाळेचं ध्येय आहे. हे सक्षमीकरण सर्वांगीण आहे. ते शाळेतल्या लहानमोठ्या प्रत्येक कृतीतून अभिव्यक्त होत आहे. संकल्पना, रचना आणि अंगीकारातून उमलताना दिसत आहे. एक उदाहरण देते. पहिला तास गणिताचा झाला. त्यात वजने-मापे शिकवली गेली. पाठोपाठ त्याच शिक्षिकेसह त्याच वर्गानं स्वयंपाकघरात चटण्या तयार केल्या. मागच्या तासाला शिकलेल्या वजनामापांचा उपयोग आणि वापर त्यामध्ये साहजिकपणे झालाच. चटण्या तयार झाल्या, त्यानंतर रोजच्या खिचडीच्या जेवणात त्या चटण्यांचा आस्वादही घेतला गेला. हे अचानक घडलेलं नाही, यामागं सुस्पष्ट रचना आहे. वर्गात पाठांची रचना, विषयाचा विचार आणि तयारीही शिक्षिकेनं अगदी जाणीवपूर्वक केलेली दिसत होती. पुढचा तास सामान्यविज्ञानाचा. त्यात त्याच शिक्षिकेनं 'अन्न आणि त्यातून होणारं पोषण' हा घटक घेतला. मुलं चवीनं चटण्या खात असताना शिक्षिकेनं आपल्या मनातल्या पोषणविचारांना मधेमधे अजिबात घुसडलं नाही, खाणं झाल्यावर पोषणाचा पाठ घेतला ! यामध्ये कदाचित अभ्यासक्रमाच्या चौकटीतली पोषणाचा पाठ घेण्याची एरवीची अपेक्षित जागा तिला बदलावी लागली असणार. तेवढी मोकळीक शाळेत आहे.

याचा अर्थ प्रत्येक छोट्यामोठ्या कृतीत क्रमिकशिक्षण घुसडवतात असंही नाही. काही वेळा कृतीतून आणखी वेगळंच काही शिकण्याचा किंवा मन लावून ओल्या मातीतून पणतीचं शिल्प (!) घडवण्यात गढून जाण्याचा अवकाशही विद्यार्थ्यांना मिळायला हवा, याची आनंद निकेतनला जाणीव आहे.

आनंद निकेतनमध्ये शासनाचा शिक्षणक्रमच राबवला जातो. मात्र त्याची पुनर्रचना 'नयी तालीम'च्या तत्त्वज्ञानानुसार इथल्या शिक्षकसमुदायानं केलेली आहे. त्यामुळे तो अंगीकारताना म्हणजे मुलांपर्यंत पोचवताना त्यातलं सत्य, तथ्य आणि सूत्र हरवू न देण्याची जबाबदारी आपसूकच घेतली जाते. सामान्यपणे बालकांचा बौद्धिक विकास व्हावा म्हणून त्यांना शिक्षण द्यायचं अशी समजूत सर्वत्र रूढ आहे. शरीरमनाचा एकत्रित विचार आणि त्यातून निर्माण होणारी समज शिक्षणव्यवस्थेत सदैव दुर्लक्षित आहे. त्या अर्थानं विकासाच्या सर्व अंगांकडे बौद्धिक, शारीरिक, मानसिक, भावनिक आणि सर्वहिताच्या बाजूनं बघणारं 'नयी तालीम' हे एकच शैक्षणिक तत्त्वज्ञान आहे. शेती, स्वयंपाक, मातीकाम, सूतकताई, विणकाम करतकरत इथल्या मुलामुलींना संबोधक्षमतांच्या आणि कौशल्यांच्या एकत्रित विकासाची संधी मिळेल अशी आनंद निकेतनच्या अभ्यासक्रमाची रचना आहे. शारीरिक कौशल्यांचा सुयोग्य, उत्पादक वापर आणि बौद्धिक विचारप्रक्रिया यांची सांगड इथं अतिशय उत्तम घातली जाते.

ही शाळा निमशहरी भागात आहे. बहुतेक विद्यार्थीदेखील निम्न आर्थिक व सामाजिक स्तरातून येणारे आहेत. एरवी इतरत्र गरीब घरांतल्या मुलामुलींना दर्जेदार शिक्षण मिळताना आढळत नाही. भरपूर फिया भरू शकणाऱ्या शाळांमध्येच विविध साधनं, प्रयोगशाळा, क्रिडांगणं, उच्चशिक्षित शिक्षक असं सगळं दिसतं. त्यामुळे शिक्षणाच्या जोरावर पुढच्या पिढीत तरी समानता येण्याची शक्यता डावललीच जाते. ह्याचं कारण त्यांची लायकीच कमी असल्याचंही वर म्हटलं जातं.

दर्जेदार शिक्षण गरीब घरातल्या मुलामुलींनाही देता येतं आणि त्यांचा विकास होण्यातही कुठलीही अडचण येत नाही, हे आनंद निकेतनच्या प्रयोगातून सिद्ध होताना दिसत आहे. समाजाच्या उतरंडीतल्या शेवटच्या घटकापर्यंत दर्जेदार शिक्षण पोचवण्याच्या या प्रयत्नाची नोंद शिक्षणगळती, शिक्षणस्थगितीसारख्या राष्ट्रीय समस्यांच्या पार्श्वभूमीवर विशेष महत्त्वाची आहे. समानतेचं राष्ट्रीय ध्येय अर्थपूर्ण पद्धतीनं साकारण्याच्या दृष्टीनंही ह्या प्रयत्नाची विशेष दखल घेतली जायला हवी. पालकांची गरिबी ही शाळेच्या दृष्टीनं अनेकदा अडचण असते. मुलांनी काही

तोडफोड केली तरी पालकांकडून भरून मिळण्याची शाश्वती नसते. आनंद निकेतनमध्ये असं जेव्हा घडलं तेव्हा त्याबद्दल विद्यार्थ्यांच्या सभेत चर्चा झाली. शाळेत तयार केलेल्या वस्तूंच्या विक्रीतून शाळेचं नुकसान भरून द्यायचं ठरलं, त्यासाठी अधिक काम करण्याची शिक्षा (!) संपूर्ण वर्गानं घेतली. समोर कुठलीही अडचण आली तर जणू आपल्या कल्पकतेला आलेलं आव्हान मानून तिच्यावर मात करण्याचा या लोकांचा प्रयत्न एकेकदा आपल्याला थक्क करून सोडतो.

शिक्षणक्रमातून नेमकं शिक्षण खरोखरीच घडतं की काय असा प्रश्न अनेकदा मांडला जातो. आनंद निकेतननं मात्र तक्रारी करत न राहता अर्थपूर्ण दृष्टीनं शिक्षणक्रमातील नेमकी लवचीकता शोधून वापरलेली आहे. प्रयोगशील आणि संवादी पद्धतीनं शिकवण्याची आणि शिकण्याची पद्धत इथं सर्वत्र वापरली जाते. शिकण्याशिकवण्याचे सर्व अनुभव शाळेत प्रत्यक्ष केलेल्या कामाशी संलग्न असतात. त्यातून मुलामुलींनीही त्या कार्यक्रमांमध्ये मनापासून जागरूकपणे समरस व्हावं ह्यासाठी शाळेतलं वातावरण पोषक असावं, अशी काळजी इथले शिक्षक तयारीनं आणि सातत्यानं घेत असतात. विद्यार्थी, कृती आणि जीवन हे केंद्रस्थानी ठेवूनच शिकवण्याच्या प्रक्रियेचा समतोल इथं साधलेला आहे.

इतर शाळांप्रमाणेच इथले शिक्षकही समाजाच्या विविध आर्थिक, सांस्कृतिक स्तरांतूनच आलेले असतात. त्या सर्वांनी औपचारिक शिक्षक-प्रशिक्षण घेतलेलं असतंच असंही नाही. 'नयी तालीम'ची समजूत त्यांच्या मनात सुस्पष्ट असणं तर अवघडच. तरीही शाळाव्यवस्थापनानं त्यांना वाढीच्या अनेक संधी उपलब्ध करून दिल्या असल्यानं ह्या नव्या पद्धतीत तेही शिकत असतात, त्यांनाही विकासाच्या संधी हव्याच असतात, आणि ही शाळा त्यांना देतेही. साहजिकच अनेक वर्षं इथं शिकवणाऱ्या शिक्षकांनी नयी तालीमचं तत्त्वज्ञान अधिक आत्मसात केलेलं आहे, तर नवे लोक अजून शिकण्याच्या वाटेवर कमीअधिक अंतरापर्यंत पोचलेले दिसतात. शिक्षकांच्या शिकण्यासाठी शाळेनं आयोजलेल्या शिक्षकप्रशिक्षण कार्यक्रमांचा आणि एखाद्या शिक्षणप्रकल्पाच्या निमित्तानं वेळोवेळी कळतनकळत मिळणाऱ्या अनुभवांचा, तसंच सूचना - सहकार्याचाही अंतर्भाव आहे.

अर्थात, या शाळेत शिक्षक होणं सोपं आहे, असं मात्र कदापिही मानू नये. नयी तालीममध्ये शिक्षक होण्यासाठी आवश्यक असलेले गुण इतर शाळांतील शिक्षकांच्या अर्हतापातळीहून बरेच अधिक आहेत. या शिक्षकाला विषय शिकवण्याशी हस्तकलेची सांगड घालता येणंही तितकंच आवश्यक आहे. प्रचंड अंत:प्रेरणा, सर्जनशीलता, विषयाचं सखोल ज्ञान आणि ह्या कृतीपूर्ण शिक्षणप्रक्रियेचं आकलन हे इथल्या शिक्षकांकडे असावंच लागतं. शिक्षकांच्या गुणवत्तेत काही कमीअधिक असल्याचं मी म्हटलं असलं, तरी एकूणात पाहता त्यांचं काम मी उत्तमच मानते कारण अशा छोट्यामोठ्या कमतरता दूर करणारी एक अमोघ शक्ती त्यांच्याकडे आहे. त्यांची आपल्या कामावर आणि नयी तालीमच्या गांधीविचारांच्या सक्षमतेवर निरतिशय श्रद्धा आहे.

शासकीय अपेक्षांप्रमाणे आवश्यक असलेली शिक्षणविषयातली पदवी किंवा पदविका आनंद निकेतनच्या काही शिक्षकांकडे नाही. त्यामुळे समेटीव्ह आणि फॉर्मेटीव्ह इव्हॅल्युएशन किंवा कन्स्ट्रक्टीविजम वगैरे शैक्षणिक संकल्पनात्मक संज्ञा त्यांनी शिकलेल्या नाहीत. त्यामुळे त्यांचं फारसं अडत नाही. काही संज्ञा माहीत नसल्या तरी त्यासाठी मुख्याध्यापकांच्या मार्गदर्शनाखाली या शिक्षकांनी काही अभिनव आणि सर्जनशील मार्ग शोधून काढलेले आहेत. एकतर नाव न कळताही प्रत्यक्षानुभवातून त्यातल्या बऱ्याचशा संकल्पना त्यांना समजलेल्या आहेत. त्यासाठी जडजड टेक्स्टबुकांचं वाचन जरी केलं नाही, तरी त्या विषयावरची चर्चा, परिसंवाद शाळेत आयोजित केले जातात. त्या विषयांवरची सोप्या भाषेत लिहिलेली पुस्तकं वाचायला मिळतात. इतरत्र कुणी आयोजित केल्या असल्या तर अभ्यास कार्यशाळांना किंवा काही शैक्षणिक सहलींना आवर्जून पाठवलं जातं. पण तरीही काही वेळा कमतरता उरतेही. आनंद निकेतनच्या वाचनालयात शिक्षण-विचारांबद्दलची पुस्तकं उपलब्ध असावीत, (त्यातली बहुतेक तिथे आहेतही) ती आणि आज सर्वत्र उपलब्ध असलेल्या माध्यमस्रोतांकडून मिळवून वाचन वाढवलं तर त्यांच्या शिकवण्याचा दर्जा सुधारेल असं म्हणावंसं वाटतं.

विद्यार्थ्यांच्या निरनिराळ्या गरजा लक्षात घेऊन त्यानुसार हे शिक्षक पाठांची आखणी करत असतात. त्यांना त्यांचे विद्यार्थी नीट कळलेले आहेत. त्यामुळे सर्व प्रकारच्या विद्यार्थ्यांना विविध शिक्षण-कृती करायला मिळाव्यात, वेगवेगळ्या शिक्षणपूरक अनुभवांना सामोरं जायला मिळावं, यावरही त्यांचा कटाक्ष असतो. विविध गरजा भागवणारे वर्ग आणि त्यासाठी सुयोग्य असलेलं संस्थेतलं वातावरण ही या शाळेची अजून एक उल्लेखनीय बाब.

एका वर्गात शब्दकोड्यांचा तास होणार होता. वर्गात मुलं येण्यापूर्वी त्या विषयाची ओळख करून देणाऱ्या फलकांची भित्तिपत्रकांची रचना शिक्षिकेनं वर्गात आधीच करून ठेवलेली होती. 'भिंतीवर काय लावलंय ते बघा' अशी आज्ञा न देता त्यांनी त्या तासाला बसायची व्यवस्था तिकडे लक्ष जाईलच अशी केलेली होती. पाठासाठी आवश्यक असलेलं साहित्य इथं वर्गातल्या शेल्फाकपाटात उपलब्ध असतं. कृतीकार्यक्रमातून शिक्षण म्हणजे एबीएल (Activity Based Learning) काही शाळांमध्ये आता सुरू झालेलं आहे. साहजिकच त्याची योजना शिक्षणव्यवस्थेनं आखून दिलेल्या चाकोरीनुसार होत असते. आनंदनिकेतनमध्ये ते आधीपासूनच सुरू आहे. मात्र इथं त्याची आखणी शिकण्याच्या गरजेतून आणि शिक्षकांच्या सर्जनशील वृत्तीतून केली जाते.

विविधतेचा मान राखून सर्व मुलांचा विकास होईल यासाठी हे शिक्षक योग्य, समर्पक शिक्षण-पद्धतीचा अवलंब करतात. याकरता त्यांनी काही विशेष तंत्रंही विकसित केलेली आहेत. मुख्यत: इथं गटअध्ययन होतं. ते करताना इतरत्र बरोबर उत्तरं देणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वेगानं शिक्षक जात असतात, तसं मात्र इथं होत नाही. उलट मागं पडणाऱ्यांकडे इथं विशेष ध्यान दिलं जातं.

शिकवण्यासाठी शाळेकडे संगणक सोडता इतर अत्याधुनिक साहित्य उपलब्ध नाही, संगणकाचा, इंटरनेटचा वापर मात्र भरपूर करत असतात. पण सांगायची महत्त्वाची गोष्ट अशी की सभोवताली असणाऱ्या वस्तूंचा शिक्षणसाहित्य म्हणून अतिशय सर्जनशील उपयोग केलेला दिसतो. शाळेच्या आसपास बांबूची बरीच झाडं आहेत. त्यामुळे गणितातील

द्विमित, त्रिमित संकल्पनांसाठी बांबूपासून शिक्षणसाधनं तयार केलेली आहेत. चिंचोके, खडे यांचा उपयोग बालशिक्षणात करायला हवा ही काही नवी गोष्ट नाही, सर्वांना ते माहीत आहे, आनंद निकेतनात या गोष्टींचा वापर खरोखरच केला जातो हेच विशेष. वर्गात मांडलेले निरनिराळे तक्ते तर मुलामुलींनी शिकताशिकताच निर्मिलेले आहेत, त्यामुळे आज सर्वमान्य झालेल्या ज्ञानरचनेच्या वाटेनं बालमनांमध्ये उपजणाऱ्या ज्ञानाची सिद्धताच हे तक्ते आपल्यासमोर मांडतात.

विद्यार्थ्यांनी अधिक खोलवर, समग्र विचार करावा म्हणून इथले शिक्षक जिवापाड कष्ट करतात. तरीही मूल्यमापन करतेच आहे म्हणून सुचवावंसं वाटतं की, प्रश्न विचारण्याचं, विषयाच्या मुळाशी जाण्याचं कौशल्य, तसंच त्यावर उलटसुलट विचार करून सुस्पष्ट आणि तार्किक निष्कर्षांपर्यंत पोचण्याची क्षमता विकसित होण्यासाठी – आपल्या अध्यापन पद्धतीत आवश्यक सुधारणा करण्यावर शिक्षकांनी थोडं अधिक लक्ष द्यावं.

शिक्षकांचं मूल्यमापन करताना मी शक्य तेवढा सर्वांगीण प्रयत्न केलेला होता. पाठाची आखणी आणि तयारी, वर्गाचं संयोजन, प्रत्यक्ष शिकवण्याची पद्धत, विद्यार्थ्यांच्या आकलनाकडे त्यांचा विकास कुठपर्यंत होतो आहे याकडे दिलेलं लक्ष, आणि त्यानुसार आणखी पुढं नेण्यासाठी काय आखणी केली जातेय इतकंच नाही तर कुटुंब आणि समाजाशी समायोजन कसं साधलं जातंय, शिक्षक शालेय कामांमधील इतर जबाबदाऱ्या किती अगत्यानं घेतात, हेदेखील मी पाहात असे. या संपूर्ण प्रयत्नात नयी तालीमचा तत्त्वबोध मुळाशी आहे आणि त्याची जपणूक आवश्यक आहे असं तर मी मानलेलं होतंच.

अहवालात मी ते समग्र सविस्तर दिलेलं आहे, पण एकंदरीनं सांगायचं तर मी वर उल्लेख केलेल्या काही मर्यादा सोडता इथले सरासरी सर्व शिक्षक मनापासून शिकवतात, मुलामुलींना जीव लावतात, त्यांनी शिकावं म्हणून कमालीची धडपड करतात.

आनंद निकेतनच्या मुलामुलींशी बोलल्यावर मला शाळेचं नाव सार्थ असल्याचं जाणवलं. वर्गात असो की स्वयंपाकघरात, शेतात असो किंवा संगणक-कक्षात, ज्या आवडीनं आणि उल्हासानं इथली मुलं भाग घेत



## माझ्या शाळेतील माझा प्रवास

लहानपणीच प्रत्येक लेकरांच्या कानी शाळा आणि शिक्षण हे शब्द येतात. माझ्या कानावरसुद्धा आले होते. व्यक्तीला साक्षर, समजूतदार बनवणाऱ्या या प्रक्रियेद्वारे वाटचाल करताना पहिले पाउल म्हणजे बालवाडी. हे महत्त्वपूर्ण पाऊल यशस्वीपणे पार पडावे म्हणून माझ्या आई वडिलांनी आनंद निकेतन विद्यालयातील बालवाडीत दाखल केले .

पालकांना अनेकदा आपल्या मुलांच्या भविष्यासाठी इंग्रजी माध्यम व सीबीएस्सी हवे असे वाटत असते. माझ्या पालकांनासुद्धा तसे वाटे. यामुळेच कदाचित मला पुढील शिक्षणासाठी इंग्रजी माध्यममध्ये टाकण्यात आले .मी टवाळखोर वृत्तीचा असल्यामुळे पुस्तकी अभ्यासात सुरवातीपासूनच माझं मन मला रमवता आले नाही वर्गामध्ये ३५-४० मुले असल्यामुळे माझ्याकडे व्याक्तिगत लक्ष देणे शिक्षकांना शक्य झाले नाही ; पण मी बुद्धू नाही याची मला जाणीव मला होती. त्यामुळेच माझा आत्मविश्वास कधीच खालावला नाही. अशाच प्रकारे मी सातव्या वर्गापर्यंत शिक्षण पूर्ण केले.

सहाव्या वर्गात असताना मी वर्गातला शेवटच्या स्थानी असलेला विद्यार्थी होतो. असा विद्यार्थी ज्याच्या मनात त्यावेळी शिक्षणाविषयी चीड निर्माण झाली होती. या स्थितीला वैतागून मी माझ्या वडिलांना म्हणालो होतो की मला पुढचे शिक्षण मातृभाषेत घेण्याची इच्छा आहे. त्यावेळी मला वडिलांकडून नकार मिळाला होता. सातव्या वर्गाच्या शेवटी सुद्धा मी त्यांना तीच विचारणा केली होती की, मी आनंद निकेतन विद्यालयामध्ये जाऊ का ? पण बाबा म्हणाले, याकरीता मी तुला माझ्या कामामुळे मदत करू शकणार नाही, तेव्हा मी स्वतःच माझी T.C. काढून आनंद निकेतनमध्ये दाखला घेतला आणि या प्रक्रियेत मला सर्वात जास्त सहयोग व आनंद निकेतन विषयी माहिती देण्याची मदत मालतीताईंनी केली, त्याबद्दल त्यांचा मी नेहमीच मन:पूर्वक आभारी राहील.

आनंद निकेतन विद्यालयात माझा प्रवेश म्हणजेच माझ्या प्रगतीच्या आशेची किरणे होती . शाळेत आल्या आल्याच मी फार मोठ्या चुका केल्या होत्या. पण सुदैवाने मला मित्रमंडळी व शिक्षकांनी सामावून घेतले. मला पूर्वी न येणारे विषय गणित, भूगोल, इतिहास, मराठी, हिंदी या विषयांमध्ये मी प्रगती करू लागलो आणि माझ्या या प्रगती बरोबरच गांधी, आंबेडकर आणि अनेक विचारवंतांचे विचार कानावर पडले व सामाजिक घडामोडींशी असलेले आपले नाते कळले. इतिहास तर मी पुस्तकातला शिकतच होतो पण इतिहासातील काही घटना शाळात साजऱ्या केल्या जाणाऱ्या सण व सांस्कृतिक माध्यमातून माझ्या कानावर पडतच होत्या.

माझे आई वडील आता माझ्यात होत असलेल्या बदलाने आनंदी व समाधानी आहेत.

माझ्या जीवनाला मिळालेला या प्रगतशील वळणाला मदतरूप माझ्या शाळेतील सर्व शिक्षक, मित्र मैत्रिणी, बाहेरून आलेले ताई-दादा आहेत व या सर्वांचे मी मनापासून आभार मानतो .माझ्या शाळेचे माझ्यावर असलले ऋण मी कधीच विसरू शकणार नाही.

माझ्या शाळेसाठी काही ओळी सादर करत आहो :-

येथे नांदतात श्रमर्षी, या भूमीला शरण नाही.
येथे ज्ञान, गळते घाम, विज्ञान दानव शरण नाही.
येथे कला जीवनमय, अर्थाला अपहरण नाही
येथे भविष्य जन्मते आहे, या सीमांना मरण नाही !

**- वेद डगवार**
इयत्ता : १० वी

असतात हे बघणंही आनंददायक आहे. अपेक्षित चौकटीत स्वत:ला न मोजता जे जे उत्तम, उदात्त ... ते ते गाठायचा प्रयत्न करत असतात. त्यांच्या मनात आपल्या क्षमतांबद्दल ठाम आत्मविश्वास असतो, त्यामुळे सर्वत्र दिसणारी परीक्षांची भीती मला त्यांच्यात अभावानंच आढळली. आपण कुठं कमी पडलो हे जाणून घेऊन त्यात सुधारणा करण्याचीही त्यांची तयारी असते. स्पर्धेपेक्षा सहभागानं अधिक चांगलं यश हाती सापडतं, हे उमगलेली ही मुलं इतरांना मदत करण्यात, एकत्र काम करण्यात कुठंही मागं पडत नाहीत. मुख्य म्हणजे शाळेच्या मूल्यविचारांचं एक नकळत म्हणावं असं अचूक आकलन त्यांना झालेलं असावं. त्यामुळे एखाद्या परिस्थितीतला सर्वहितकारी न्याय्य निर्णय कुठला, नेमकं काय करायला हवं हे ती अचूक स्पष्टपणे सांगतात आणि अंगीकारतातही.

कुठल्याही मुलांमुलींना जगताना शिकताना अनेक प्रश्न पडतातच, मात्र ते शिक्षकांना बिनदिक्कतपणे विचारण्याचा हक्क या मुलामुलींना मिळालेला आहे, आणि ते तो मनापासून बजावतातही. अभ्यासक्रमाच्या मर्यादा ओलांडून वारेमाप प्रश्न विचारतात, जाणून घ्यायचा आपणहून प्रयत्न करतात. एका वर्गात 'तुम्हाला काय व्हायचंय' ह्यावर चर्चा सुरू होती. एकानं 'शेतकरी व्हायचंय' असं सांगितलं. घरची शेतीची पार्श्वभूमी नसलेल्या मुलानं असं सांगितल्याचं समजलं तेव्हा अधिकच आश्चर्य वाटलं. शेतकरीच का व्हायचंय यावर भरपूर चर्चा झाली. त्याला वेगळ्या प्रकारे शेती करायची होती. त्यावरून 'सेंद्रिय शेती कशी करतात' इथपर्यंत ती चर्चा गेली. शाळा भरताना सुरवातीला परिपाठ असतो, तेव्हा आसपासच्या घटना, परिस्थितींबद्दल विद्यार्थी आणि शिक्षकांची चर्चा होतेच. मला खात्री आहे, डीमोनिटायझेशनवर आनंद निकेतनच्या मुलामुलींनी जोरदार चर्चा केलेली असणार.

चार लोकांसमोर न घाबरता बोलण्याचा बराच सराव इथल्या मुलामुलींना शाळेत झालेला असावा.

आपल्याला काय म्हणायचंय, ते अगदी मनमोकळेपणानं आणि स्पष्टपणे सांगतात. शाळेवर त्यांचं अपरंपार प्रेम आहे. शाळेच्या स्वच्छतेत आणि सुशोभनात मनापासून सहभागी होताना दिसतात. सतत कुठल्या ना कुठल्या चांगल्या कामात रमून गेलेली मुलं बघायची असतील तर आनंद निकेतनला जरूर भेट द्यावी. इतरत्र आजकाल हे बघायला मिळत नाही.

आपली शाळा इतर शाळांपेक्षा वेगळी आहे, त्यामागं शाळेच्या शिक्षकांचे विशेषत: मुख्याध्यापकांचे परिश्रम आहेत, हे ह्या मुलामुलींना न सांगता उमगलेलं आहे. या वेगळेपणाचा पडताळा त्यांच्या उत्तरांमधूनही जाणवतो आणि शिक्षकांबद्दल विशेषत: मुख्याध्यापकांबद्दल कमालीचं प्रेम आणि आदर त्यांच्या मनात असल्याचंही दिसतं. बालवर्गापासून याच शाळेत शिकलेली मुलं, त्यानंतरच्या एखाद्या टप्प्यावर शाळेत आलेल्या मुलांच्या तुलनेत अधिक तयारीची असल्याचं दिसतं. अगदी लहानवयापासून आनंद निकेतनच्या मोकळ्या आणि तरीही कामसू वातावरणात वाढण्याचाच हा परिणाम आहे.

शाळेत आल्यावर विविध कामा-उद्योगात रमलेले असल्यामुळे असेल, किंवा त्याचमुळे दिलेल्या बाकावर जखडलेले नसल्यानं असेल पण ही मुलं दिवसभर उत्साहातच असतात. शाळेत येताना आणि शाळा सुटल्यावर मुलामुलींनी आनंदात असणं सगळीकडे दिसतं. पण जखडलं न जाता आपल्या असण्याचा संपूर्ण सर्वदिश वापर होत असल्याचा प्रत्यक्षानुभव सातत्यानं घेतल्यानं ही मुलं सतत तजेलदार दिसतात.

केवळ प्रश्न विचारण्याचीच नाही तर न्यायासाठी झगडण्याची आणि प्रसंगी शिक्षकांना आपले निर्णय बदलवायला लावण्याची हिंमत या मुलामुलींकडे आहे. शाळेची संपूर्ण संरचना लोकशाही मूल्यांवर आधारित असणं हे नयी तालीमच्या विचारांमधलं गृहीतक आहे. ही शाळा मुलांची आहे, शिक्षकांची आहे, पालकांची आहे, तेव्हा शाळेचे निर्णयही या सर्वांचेच आहेत आणि ते न्यायाचे आणि सर्वहितार्थी विचारांनी घेतलेले असावेत हे इथल्या विद्यार्थी व शिक्षकांना अचूक साधलेलं आहे. त्यासाठी आनंद निकेतनचे शिक्षक, मुलं आणि मुख्याध्यापकही अभिनंदनाला पात्र आहेत. हे सोपं नाही, हे जगातील सर्वात मोठ्या लोकशाही देशातल्या आपल्या सर्वांना माहीतच आहे. हे कसं साधलं हा प्रश्न मलाही पडला, आणि माझ्या मते त्याचं बरंच श्रेय शाळेच्या मुख्याध्यापकांच्या नम्र, अनाग्रही स्वभावाला जातं. याचा अर्थ त्या



गरीब सोशीक स्वभावाच्या आहेत असा नाही. मात्र अगदी न पटलेला मार्ग कुणी मांडला तर 'या प्रकारे करून बघू म्हणजे आपोआप काय ते कळेल' अशी मुभा देण्याइतकी लोकशाहीची शहाणीव त्यांच्याजवळ आहे.

इतकं सगळं असलं तरी आनंद निकेतनसमोर 'आता काहीच प्रश्न नाहीत' अशी परिस्थिती नाही. दिवसा-वर्षांनी ही शाळा अधिकाधिक पुढंच जावी अशी आपली इच्छा असली तरी ती वाट काट्याकुट्यांचीही आहे. आर्थिक आव्हानं तर अशा शाळांसमोर असतातच, तशी इथंही आहेत, त्याहून मोठं आव्हान आहे ते व्यक्तिनिरपेक्ष सातत्यानं सुरू राहाण्याचं. आज मिळत असलेलं अनेकांचं सहकार्य उद्या उरलं नाही तरी खचून न जाण्याचं. या आव्हानाला सामोरं जाण्याची वेळ आली तर त्यासाठी लागणारी धमक आनंद निकेतनकडे यावी अशी माझी मनापासून इच्छा आहे.

– प्राचार्या,
एस.एन.डी.टी शिक्षणशास्त्र
महाविद्यालय, पुणे
leena_desh@yahoo.co.in

(ह्या लेखाची रचना डॉ. लीना देशपांडेंनी केलेल्या मूल्यमापनाच्या अभ्यासअहवालावर आणि अनुभवांवर संपूर्णपणे आधारलेली आहे. त्या अहवालाच्या हेतूनुसार आवश्यक असलेली शिक्षणशास्त्रीय आणि इंग्रजी भाषा मात्र इथं बदललेली आहे. रूपांतरण साहाय्य : संजीवनी कुलकर्णी )

# शिक्षणाच्या परिवर्तनाचे स्वप्न

अनिता रामपाल

## संविधानातील मूल्ये आणि शिक्षणाचे उद्दिष्ट

एकदा आनंद निकेतनमध्ये सहावी ते दहावीच्या मुलांबरोबर चर्चा चालली होती. विषय होता– शिक्षण–हक्क–कायदा. मी मुलांना विचारले की परीक्षेत नापास झाल्यावर कसे वाटते, वर्गात मागे ठेवले तर कसे वाटते... कुणाला अनुभव आहे का... बऱ्याचशा मुलांना मागच्या वर्गात ठेवण्याचा काही अनुभव नव्हता. पण दहावीतला एक मुलगा उभा राहिला आणि विचार करून बोलायला लागला. तो दुसऱ्या शाळेतून या शाळेत आला होता. त्या शाळेत नापास केल्यावर तो संपूर्ण निराश झाला होता. पण या शाळेत आल्यावर त्याला 'आपण कुणीतरी आहोत' याची जाणीव झाली होती, तो विचार करायला लागला होता. 'आपल्याला काय काय येत नाही' आणि 'परीक्षेतले गुण' यांच्या पलीकडे विचार करायला त्याला इथे आल्यावर प्रोत्साहन मिळाले होते. आपल्याला काय येते, आपल्याला काय करावेसे वाटते याचा विचार करायला जागा मिळाली होती. सगळ्यांनाच हे पटत होते. मुलांचे हक्क, मुलांची बाजू मोठ्यांनी ऐकून घ्यावी म्हणून काय करता येईल याबद्दल आम्ही बोलत राहिलो. नुकत्याच एका मोर्चात मुलांनी भाग घेतला होता, डॉ. नरेंद्र दाभोलकरांच्या हत्येनंतर हा मोर्चा निघाला होता. विवेकाच्या बाजूने उभे राहण्यासाठी मुले त्यात सामील झाली होती. माणूस नसला तरी विचार जिवंत राहतील असे मुले सांगत होती.



आपापले अनुभव, आणि त्यांचा आपल्या संस्कृतीच्या संदर्भात घेतलेला शोध यांच्या आधारावर मुले त्यांचे ज्ञान कसे रचत जातात यावर NCF २००५ ने भर दिला आहे. शिक्षकाच्या तोंडून किंवा पाठ्यपुस्तकामधून दिली जाणारी माहिती हे शिकवण्याचे माध्यम होऊ शकत नाही. शिकणे ही सामाजिक प्रक्रिया आहे, समाजात इतर मुलांबरोबर, मोठ्यांबरोबर, शिक्षकांबरोबर वावरतानाच ती घडू शकते. त्यामुळे शिक्षकाने शिकण्यायोग्य वातावरण निर्माण करायला हवे, शिकण्याला आधार देतील अशा रचना तयार करायला हव्यात. पाठ्यक्रमसुद्धा समग्र आणि एकात्मिक असायला हवा, त्यात अभ्यासाचे विषय आणि पूरक विषय अशी कृत्रिम विभागणी नको. संगीत, कला, हस्तव्यवसाय हे भाषा, गणित, विज्ञान, इतिहासापासून वेगळे काढू नयेत. हे विषय एकमेकांपासूनदेखील स्वतंत्र करू नयेत, ते एकमेकात मिळून जावेत. म्हणजे थोडक्यात, त्यांची रचना अशी हवी की उदा. गणित शिकवताना मुलाच्या आयुष्याशी तर त्याचा सांधा जुळलेला असेलच, (Rampal, Saraswathi and Ramanujam, शिवाय हस्तकला, भाषा आणि इतिहासाशीसुद्धा ते जोडलेले असेल. (2000)

हे करणं म्हणजे एक आव्हानच आहे, कारण आजची शिक्षण–व्यवस्था मुळीच लवचीक नाही आणि विषयांचा मुलांच्या रोजच्या जगण्याशी काही संबंधच नाही. हे केवळ अभ्यासक्रम, पाठ्यपुस्तके तयार करणाऱ्यांनाच अवघड वाटेल असे नव्हे, तर शिक्षकांनादेखील! वर्ग नियंत्रणात हवा आणि तिथे सर्व मुलांनी गप्प राहून आपले ऐकावे, सूचना पाळाव्यात, विचारले तेवढेच सांगावे अशी अपेक्षा असेल तर हे अवघड आहेच.

आजचे मूल्यमापन देखील पुस्तकातली माहिती पाठ करून बिनचूक लिहिता येण्याच्या ओझ्याखाली दबलेलेच आहे. विचारशीलता, संशोधन,अभिव्यक्ती, कल्पकता, नावीन्य या कशालाच प्रोत्साहन द्यायचा प्रयत्नच मुळी केला जात नाही.

आपल्या संविधानात जी मूल्ये मार्गदर्शक म्हटलेली आहेत, त्यानुसार समता, न्याय, स्वातंत्र्य, दुसऱ्याच्या भल्याची काळजी, सर्वधर्मसमभाव, मानवी हक्क आणि प्रतिष्ठा याप्रति आदर यांना बढती मिळावी/ यांची स्थापना व्हावी हे शिक्षणाचे ध्येय स्पष्टपणे मांडले गेलेले आहे. हे पाठ्यपुस्तकात म्हणणे तर सोपेच आहे, विशेषतः पाठ्यपुस्तकातून किंवा शिक्षकाने नीतीमत्तेवर प्रवचन द्यायचे असेल तेव्हा... पण केवळ ते कानावर पडल्याने मुले चांगले वागू लागतील का? इतरांबद्दल त्यांना आपलेपणा वाटला, त्यांच्या अनुभवाबद्दल प्रश्न पडले, त्याबाबत बोलणे झाले तरच कुठेतरी मुलांना इतरांशी आपले काही नाते आहे, त्यासंबंधी काही कर्तव्य आहे, ते पूर्ण करायला हवे असे वाटेल. त्यासाठी प्रोत्साहन मिळेल. समाजातली विषमता, लोकांवर होणारा अन्याय अशा गैरसोयीच्या मुद्द्यांकडे शाळा सामान्यपणे लक्ष देत नाहीत, खरे तर ते प्रामाणिकपणे, धैर्याने मान्यदेखील करत नाहीत.

NCF ने म्हटले आहे की धर्म, जाती, भाषा, संस्कृती, लिंगभाव, अपंगत्व यासंदर्भात केल्या जाणाऱ्या भेदभावामुळे निर्माण होणाऱ्या प्रतिकूल परिस्थितीबद्दल वर्गात थेटपणे बोलले गेले पाहिजे. दिल्या जाणाऱ्या कामामधून आणि होणाऱ्या चर्चांमधून हे करता येईल. NCERT च्या पाठ्यपुस्तकांमध्ये अशी विविध जीवनपद्धतींमधली उदाहरणे दिलेली आहेत. यावरून वर्गात उलटसुलट चर्चा घडू शकतात. आपापल्या श्रद्धांसह झालेल्या बोलण्यानंतर या मूल्यांबद्दल एक वचनबद्धता निर्माण होऊ शकते. खरे तर लिंगभाव, धर्म, जाती या संदर्भातल्या समतेच्या कल्पना नव्याने निर्माण करणे मोठ्यांसाठीच अवघड जाते. मिश्र गटात वाढणाऱ्या मुलांना न्यायाची आणि

समतेची जाण सहजपणे येते.

**न्याय्य / योग्य शिक्षणासमोरची आव्हाने**

पण दुर्दैवाने आपल्या बहुसंख्य शाळात वेगवेगळ्या आर्थिक गटातील मुलांना एकत्र वाढण्याची संधी मिळतच नाही आणि त्यामुळे समता आणि न्यायासारख्या महत्त्वाच्या मुद्द्यांवर विचार करावा, विश्लेषण, चर्चा, कृती करावी अशी संधीही त्यांना मिळत नाही. आता तर हे फार महत्त्वाचे होते आहे, कारण सर्वांसाठी एकच शाळा दिल्याने जी नाती जुळली असती, त्याऐवजी स्तरित शिक्षण-व्यवस्थेमुळे विषमता नव्याने तयार होते आहे. वेगवेगळ्या शाळांना साधनसंधींची उपलब्धता वेगवेगळीच आहे. सरकारी शाळा घेतल्या तरी त्यात नवोदय / केंद्रीय विद्यालयांपासून जिल्हा परिषद शाळा असे प्रकार आहेत.

आता तर त्यात स्वस्त खाजगी शाळाउद्योगाची भर पडली आहे. इथे लोकशाही मूल्यांचे काही महत्त्व नसून, केवळ लिहिणे-वाचणे-आकडेमोड करू शकणारी कुशल आज्ञाधारक फौज तयार करण्याचे हे कारखाने आहेत. आहे त्याच विषमतेत ही ज्ञान विरुद्ध कौशल्य, शैक्षणिक विरुद्ध व्यावसायिक, इंग्रजी माध्यम विरुद्ध मातृभाषा, प्रत्यक्ष विरुद्ध आभासी (कॉम्प्यूटरकडून शिकणारे) अशा असंख्य भेदभावांची भर पडत चालली आहे. शिक्षण-हक्क कायद्यात म्हटले आहे की सर्व मुलांना आठवीपर्यंत समान दर्जेदार शिक्षण मिळायला हवे, शिवाय NCFने म्हटल्यानुसार दहावीपर्यंत अभ्यासक्रम समान हवा; पण सध्या अशा हालचाली चालू आहेत की तिसरीपासून (!!) व्यावसायिक अभ्यासक्रम वेगळा राबवला जावा.

आनंद निकेतनमधल्या विद्यार्थ्यांशी बोलताना आम्हाला संविधानातील मूल्यांचा पुरस्कार करण्याची नयी तालीम पद्धतीतील ताकद लक्षात आली. नयी तालीम सुरू झाली तेव्हा ती जी क्षमता होती, ती आजही तशीच कायम आहे. स्वातंत्र्यलढ्याचा एक भाग म्हणून नयी तालीमचा उदय झाला. लोकशाही, निधर्मी, स्वावलंबी देशनिर्मितीसाठी शिक्षणव्यवस्थेत परिवर्तन घडवायला हवे ही जबाबदारी तेव्हा घेतली होती. हाताने काम करणे हे शिक्षणाचे माध्यम करण्याचे परिणाम दूरगामी झाले. मन-बुद्धी-हात यांचा तर समन्वय झालाच, शिवाय श्रमांना प्रतिष्ठा लाभली. विशिष्ट व्यवसायांवर लागलेला जातिभेदाचा काळिमाही दूर झाला, समतेकडे वाटचाल सुरू झाली.

**नयी तालीम :**

**ज्ञानाची, कामाची नवी व्याख्या**

उत्पादक कामातून शिक्षण दिल्याने मुलांमध्ये सहकार्य वाढेल, एकी वाढेल, त्यांना आत्मसन्मान मिळेल असा उद्देश होता. मुदलियार शिक्षण समितीच्या अहवालात (१९५२) अधोरेखित केले आहे की एकत्र काम करणाऱ्या संघांमध्ये मुद्दामहून नियम न सांगताही स्वयंशिस्त दिसून येत असे. जम्मू-काश्मीरमधल्या नयी तालीम शाळांनी ५० सालानंतर दवाखाने आणि रेशन दुकाने चालवली होती. नागरिकत्वाच्या या शिक्षणातून मुलांचे समाजाशी नाते दृढ झाले. (Saiyadain, 1963). अशा प्रकारे मुले विविध क्षेत्रात, एकात्मिकपणे, आपले ज्ञान आपण निर्माण करत होती. समाजपरिवर्तनाची जबाबदारी घेत होती आणि समाजाशी नातेही जोडत होती.

विशेष म्हणजे, नयी तालीम पद्धतीत मांडला गेलेला काम आणि ज्ञान याचा संबंध आणि ज्ञान-उभारणीच्या/ ज्ञाननिर्मितीच्या समकालीन सिद्धांतात कमालीचे साम्य आहे. (Lave, 1996). कामातून ज्ञाननिर्मिती होते, ज्ञानातून कामाला प्रेरणा मिळते, आणि ज्ञान आणि कामात असलेले अद्वैत अनुभवाला आले की जीवन फळाला येते या विश्वासावरच नयी तालीमची उभारणी झालेली आहे. ( विनोबा ). शिक्षणाच्या सामाजिक-सांस्कृतिक सिद्धांतातही विचार, कृती आणि भावनांना स्वतंत्र मानलेले नाही. त्यानुसार, ज्ञान आणि शिक्षण हे फक्त डोक्याचे काम असे म्हणता येत नाही. शिक्षण कामाच्या प्रक्रियेत असते. काम करणारी व्यक्ती, कामाची साधने, परिसर आणि प्रत्यक्ष काम यात त्याची जागा असते. एखादे काम आपण करतो, त्याच ठिकाणी ज्ञानाची उभारणी होते, ते परिपक्व होते. एखादा विषय शिकवण्यापूर्वी त्याची आखणी करताना, बालमनात ज्ञानाची रचना कशा प्रकारे घडते म्हणजे अनुभवातून, रोजच्या निरीक्षणातून आणि मूलभूत प्रेरणेतून मूल भाषा किंवा गणित कसे शिकते, परिसर कसा न्याहाळते हे माहीत पाहिजे.

उत्पादक काम अभ्यासक्रमाचा भाग असण्याविषयी आनंद निकेतन वचनबद्ध आहे. उत्पादक काम, त्यातून होणारी ज्ञाननिर्मिती, त्याची विषयशिक्षणाशी जुळणी करणारा आराखडा यांची सांधेजोड होण्यासाठी खूपच नियोजनबद्ध कामाची गरज आहे. माध्यमिक पातळीवर तर जास्तच. दहावीनंतर जे विविध मार्ग उपलब्ध आहेत त्याच्याशी जोडणी करणेही आवश्यक आहे. यामध्ये फारच थोडे कल्पक आणि नावीन्यपूर्ण मार्ग उपलब्ध आहेत.

एखाद्या व्यवसायासाठी उपयुक्त असे प्रशिक्षण देण्यापेक्षा बरेच व्यापक असे अभ्यासक्रम आपण निर्माण करायला हवे आहेत. मुले नव्याने काही निर्माण करतील, कल्पकतेने काही घडवतील, गुणवत्तेचा ध्यास धरतील यासाठी त्यांचे कुतूहल जोपासणारा हा मार्ग असायला हवा. नयी तालीमचे हे व्यापक स्वप्न आहे. आपण ते जोपासायला हवे. तरच आजच्या तरुणांना जीवन बदलवून टाकणारा उद्याचा न्याय्य, लोकशाही, वैविध्यपूर्ण, उत्पादक समाज घडवता येईल.

**References**


Lave, J. (1996) "The practice of learning'. In S. Chaiklin and J. Lave (eds.) Understanding Practice: Perspectives on ctivity and Context. Cambridge University Press, Cambridge.

Rampal, . Saraswathi , L.S. and Ramanujam, R. (2000) Zindagi ka Hisaab (Hindi); Numeracy Counts! (English). National Literacy Resource Centre, National cademy of dministration, Mussoorie. vailable online at www.arvindguptatoys.com/arvindgupta/numeracy.pdf

Saiyadain, K.G. (1963) The Problems of Educational Reconstruction. Hindi translation: Shiksha ki Punarachna. Rajkamal Prakashan, New Delhi

Vinoba (2014; 8th Edition) Thoughts on Education. (Tranlsation by Marjorie Sykes). Sarva Seva Sangh Prakashan, Varanasi.



प्राध्यापिका, शिक्षणशास्त्र विभाग,
दिल्ली विद्यापीठ
anita.rampal@gmail.com
अनुवाद : नीलिमा सहस्रबुद्धे

# काम व शिक्षण

नयी तालीम, गांधीजींनी मांडलेला शिक्षणविचार ज्याची मूळ प्रेरणा आहे असे आनंद निकेतन. देशातील खेड्यांमध्ये राहणाऱ्या सर्वात कमजोर माणसालाही स्वातंत्र्याचा खरा लाभ मिळावा, विकासाचा केंद्रबिंदू गावे असावीत असे मानणाऱ्या गांधीजींच्या विकासविचारांना अनुकूल असे मन घडवण्याचा उद्देश बाळगणारी नयी तालीम ही शिक्षणपद्धती. मन, बुद्धी व शरीर यांचा संतुलित विकास मानवतेच्या विकासासाठी आवश्यक आहे असे मानणारा हा शिक्षणविचार. उत्पादक कार्य हा या शिक्षणपद्धतीचा प्राण आहे.

नैसर्गिक साधने अमर्याद स्वरूपात सहजी उपलब्ध नाहीत. विविध कंपन्यांनी आपल्या नफेखोरीसाठी सुखाच्या कल्पना बनवाव्यात आणि आपण त्या बुद्धिहीनतेने खरेदी कराव्यात असे मोठ्या प्रमाणावर घडते आहे. कष्टाची कामे गरिबांनी करावीत आणि ज्यांच्याकडे सत्ता व पैसा आहे त्यांनी पैसा, सत्ता आणि वर सुरक्षितता देणाऱ्या जागा काबीज कराव्यात, पैसा असणाऱ्यांना हवे ते शिक्षण सहज उपलब्ध करून दिले जावे अशाप्रकारे ही खुली (!) म्हटली जाणारी व्यवस्था काम करत आहे. असे व्हायला नको असेल तर अहिंसक पद्धतीने, शाश्वत विकासाचा मार्ग सर्वांच्या सहभागातून सर्वांना खुला होईल हे बघायला हवे. अहिंसक पद्धतीने सर्वहिताच्या व्यवस्थेसाठी आपल्या मनाची आणि शरीराची तयारी करणे म्हणजेच शिक्षण. त्यानुरूप स्व आणि समाजसंवादी पद्धतीने शिकण्याचा प्रयत्न आनंद निकेतनमध्ये आज केला जातो आहे.

उत्पादक काम हे केवळ रोटी कमावण्याचे तंत्र नाही तर ते जीवनाच्या व्यापक उद्दिष्टांना सामावणारे काम आहे. बागकाम व शेती, अन्नप्रक्रिया/ स्वयंपाकातून आहार व आरोग्यशास्त्र, वस्त्रकला, साध्या यंत्रांची ओळख व उपयोग, स्वच्छ सवयी व सफाईकाम, कचरा व्यवस्थापन, नैसर्गिक साधने व ऊर्जा साधनांचे शिक्षण आणि व्यवस्थापन यांच्याशी संबंधित कामे करत व या गोष्टींची विषयज्ञानाशी अधिकाधिक सांगड घालत तसेच स्थानिक ते जागतिक प्रश्नांचा वेध घेत, वयोगटानुसार मुलेमुली असा भेद न करता शिकतात.

बालशिक्षणापासून इयता आठवीपर्यंतचा मागील दहा वर्षाचा अनुभव या शिक्षणपद्धतीवर विश्वास दृढ करणारा आहे. सर्व ज्ञानेंद्रियांच्या साहाय्याने प्रत्यक्ष अनुभव घेत, कुशल बनवणारे, आनंदानुभव देणारे, सृजनशील बनवणारे, विचारशील आणि समाजशील बनवणारे, स्वयंशिस्त रुजण्यास मदतरूप होणारे हे शिक्षण नव्या जगाची आव्हाने स्वीकारण्यासाठी उपयुक्तच नव्हे तर अनिवार्य आहे असे आम्हाला वाटते.

केवळ शेतीविषयक अनुभवांचा संक्षिप्त आढावा नमुन्यासाठी खाली देत आहे:

इयत्ता सातवीपर्यंत म्हणजे साधारणपणे १३ वर्षेपर्यंत चवळी, गवार, भेंडी, वाल, दुधी भोपळा, कारली, दोडकी, हळद यासारख्या भाज्या तर कापूस, मूग, तुरी, बाजरी, ज्वारी, मका यांची पावसाळ्यात तर मेथी, पालक, कोथिंबीर, शेपू, मुळा, बीट, गाजर, कांदा, वांगी, टमाटर यासारख्या भाज्यांची हिवाळ्यात लागवड करायला व देखभाल करायला शिकतात. हे काम करत असताना जमिनीचे मोजमाप जसे क्षेत्रफळ व परिमिती काढणे, बागेचा नकाशा स्केलनुसार काढणे, जमिनीवर भौमितिक आकृत्यांचा उपयोग करत बागेची रचना करणे इ. गोष्टी मुले शिकली. विविध ऋतूंमधील किमान-कमाल तापमान, आर्द्रता, विहिरीतील पाण्याची पातळी यांचे मोजमाप, नोंदी ठेवणे, आलेख काढणे हे सहज शिकता आले. गांडूळ-खत तयार करणे, कंपोस्टखत तयार करणे, द्रवरूप झटपट खत करणे, कीड नियंत्रणासाठी सेंद्रिय अर्क तयार करून फवारणी करणे, मित्र कीड, नुकसान करणाऱ्या किडींची तोंडओळख होणे, मधमाशा व कीटकांचे निसर्गातील महत्त्वाचे स्थान समजून घेणे, अहिंसक पद्धतीने मध काढण्याच्या पद्धतींचा परिचय होणे, हरित आवरणाच्या अभावी होणारे पाणी व मातीचे नुकसान प्रत्यक्ष प्रयोगातून समजून घेणे, नत्रस्थिरीकरणासाठी गाठी असणाऱ्या द्विदल वनस्पतींचा वापर करण्याचे महत्त्व शिकणे, कुटारावर (पिकांचे अवशेष) अळिंबीची शेती करायला शिकणे यासारख्या अनेकविध गोष्टी जाणण्याची, कौशल्ये शिकण्याचीही संधी मुलांना मिळाली. निसर्गाच्या कृपेवर बव्हंशी अवलंबून असणाऱ्या शेतकऱ्यांच्या प्रश्नाची समज त्यांना आली. श्रमाधारित जीवन जगणाऱ्या कोट्यवधी जनतेला मिळणाऱ्या कामाच्या मोबदल्यातील फरक त्यांना शेतकऱ्यांच्या मुलाखतीच्या आधारे समजून घेता आला. सहकार्यातून काम करण्याचा, मातीसह सृजनात्मकतेने जुळण्याचा आनंद अनुभवता आला. थोडक्यात पाठ्यपुस्तकातील अपेक्षित गोष्टींशिवाय ज्ञानाचा, कौशल्याचा आणि सामाजिक व भावनिक समृद्धीचा आवाका कितीतरी पटीने वाढवता येतो हे लक्षात आले.



# चांगला शिक्षक कुणाला म्हणावं?

जयश्री कामडे

**जो** विद्यार्थ्याला, त्याच्या प्रश्नांना परिस्थितीला जाणू शकतो त्याला…

शिकायचे असते ते विद्यार्थ्यानेच! शिक्षकाने विद्यार्थ्याला त्याच्या शिकण्याच्या प्रक्रियेत मदत करायची असते. म्हणून विद्यार्थ्याला शिकत असेपर्यंत मदत हे आपले कर्तव्य मानतो तो खरा चांगला शिक्षक. शिकण्याच्या, जाणून घेण्याच्या प्रति उत्सुक आणि सजग असलेल्या विद्यार्थ्याला मदत करतो, भाषा, स्पर्श, अभिनय, कला या माध्यमातून चांगला संवाद साधू शकतो, नित्य नूतन प्रयोगांसाठी उत्सुक आणि तयार असतो, चाकोरीशी बांधलेला नसतो, तो चांगला शिक्षक!

गिजुभाई बधेका म्हणतात, 'शिक्षकाने परफेक्शनिस्ट असावे पण मुलांसाठी ते अन्यायकारक ठरणार नाही याची आठवण ठेवावी. म्हणजे उत्कृष्टतेचा आग्रह धरावा पण त्यात लवचीकता असावी.' स्वतःत आणि परिस्थितीत बदल घडवून आणण्याचे धाडस, चिकाटी नि कृतिशीलता त्यांच्यात असावी. शिक्षक हा एक चांगला माणूस असावा.'

शिक्षक म्हणून आपल्याला समजलेला आशय मुलांपर्यंत प्रभावीपणे पोहोचवणे, त्यासाठी विविध पद्धतींचा व साधनांचा उपयोग करणे, मार्गदर्शक म्हणून विद्यार्थ्याला गरज लागेल तेव्हाच सल्ला देऊन कृतीप्रवण करणे, कृतीच्या पातळीवर वेळ, पद्धत, प्रमाण याबाबत अवकाश देणे, संवादक म्हणून शिकण्यास पूरक वातावरण तयार करणे, शिकण्याच्या वाटेवरचे अडथळे दूर करणे, सह-विद्यार्थी म्हणून एकत्र निर्णय घेणे, आखणी करणे व कार्यवाही करणे, करता करता शिकणे, या सर्व भूमिका गरज पडेल तशा बदलता येणे हे चांगल्या शिक्षकासमोरचे आव्हान आहे. शिकणे म्हणजे विचारामधून मनात प्रतिबिंबित होणाऱ्या समजेनुसार कृती करण्यासाठी व्यक्ती आणि समाजाला सक्षम करणे.

आमच्या शाळेत सामूहिक प्रार्थना, कुतूहल घेतले जाते. त्याचप्रकारे बागकाम, वस्त्रकला, मातीकाम, स्वयंपाक, कागदनिर्मिती, शिवणकाम, सामूहिक सफाई इ. उद्योग करत शिक्षण होत असते. सोबतच गणित, विज्ञान व इतर विषय आम्ही पाठ्यपुस्तकासहित शिकवत असतो.

योग, उद्योग आणि सहयोग हे शिक्षणाचे तीन मुख्य विषय आहेत.

योग म्हणजे आपल्या स्वतःच्या मनाला ओळखायचे.

माझ्या वर्गात एका मुलाला शिव्या द्यायची सवय होती. राग आला, दे शिवी. ते वर्गात कुणालाच आवडत नसे. एके दिवशी त्याला म्हणाले, तुला जेवढ्या शिव्या येतात तेवढ्या एका कागदावर लिही. त्याने  लिहिल्या. मग तो कागद जाळून टाकायला सांगितला, व यानंतर शिव्या देणार नाही असा मनाशी ठाम निश्चय करून टाक म्हटले - तर खरेच तसे झाले! नंतर त्याला कितीही राग आला तरी त्याने शिवीगाळ केली नाही. असे अनेक प्रसंग शाळेत घडत असतात.

शिक्षणाचा दुसरा विषय आहे उद्योग. उद्योगात केवळ चरखा असावा किंवा टकळी असावी असला माझा विचार नाही, आधुनिक यंत्रसुद्धा चालेल- असे विनोबाजी म्हणतात.

या शाळेत चरखा हा उद्योग म्हणून ठेवलेला नाही तर प्रत्येक विद्यार्थ्याचे मन एकाग्र होऊन कोणतेही काम करण्याची सवय व्हावी म्हणून चरखा आहे. इथे आम्ही मातीकामसुद्धा करतो. त्यात विद्यार्थ्यांनी सुंदर असे आकार तयार केले. उद्योग म्हणून पणत्या तयार करून त्याची विक्री केली.

जोडीने शेतीसुद्धा ठेवलेली आहे. कारण आपला देश कृषिप्रधान म्हणून ओळखला जातो. आज तर त्याची अत्यंत आवश्यकता आहे. स्वयंरोजगार म्हणूनसुद्धा याकडे बघायला काहीच हरकत नाही. लहानपणापासून मुलांना छोटे वाफे देऊन त्यात शेती करत सर्वच विषयाची जोडणी त्यात करतो. मुलांचा वयोगट जाणून त्याला विषयाचे ज्ञान देतो. पहिल्या वर्गात असेल तर वाफा वरंभा म्हणजे काय, नांगरणे , नांगर व बैलाचे निरीक्षण करावयास लावणे, मेथी, पालक कोथिंबीर अशी भाज्यांची ओळख, त्यापासून काय बनविता येते याबद्दल सांगतो. मग मुलांना रोपांची मोजणी करता येते. मोठ्या वर्गातील मुलांना वाफ्याचे मोजमाप, वाफा तयार करणे, परिमिती, क्षेत्रफळ, भौमितिक आकार, नित्यसमानता, चलन, एकचल  समीकरणे, विहिरीच्या पाण्याची पातळी, धारकता, प्रमाणित-अप्रमाणित मापके शिकविल्या जाते. विज्ञानातील रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, जीवशास्त्राची जोड असतेच. एकदा मुलांनी इडली केली होती. तर त्यात मुले प्रमाणित मापन शिकली. भाषा व कृतीतून अनुभव मिळाला. हिशेब, नफा-तोटा, एकचल समीकरणाचे ज्ञानच त्यांना मिळाले. शाळेतील सर्व विद्यार्थ्यांना इडली खाऊ घातली. एक प्लेट इडलीचा खर्च काढला. मेहनत वगळता त्याची किंमत साधारणतः २५ रु. आली. मुले लागलीच म्हणाली, "ताई, असा व्यवसाय सुरू केला तर कोणी उपाशी राहणार नाही. नोकरीपेक्षाही आपण स्वतःचे मालक स्वतः राहू."

शिक्षणातील तिसरा मुद्दा आहे, सहयोग.

आताची गोष्ट इयत्ता सहावीमधील. पालकसभेत एका विद्यार्थ्याच्या आईने तक्रार केली, "तो माझे ऐकत नाही. समजा अभ्यास कर म्हटले, तर तो माझे शिक्षण काढतो. एवढ्या चांगल्या शाळेत असूनसुद्धा हा असा का वागतो?" आम्ही तिची बाजू पूर्णपणे ऐकून घेतली. त्यानंतर त्या विषयावर चर्चा झाली. मुलाने कबूल केले की आता तो त्याच्या वागण्यात बदल करेल. दुसऱ्या पालकसभेत त्याची आई म्हणाली की आता त्याच्यात थोडा बदल तरी नक्कीच झालाय. सहयोगामध्ये सर्वांचा म्हणजे प्राण्यांचा, मानवांचा सर्वांचा सहयोग अपेक्षित आहे. सहयोगासाठी काय पाहिजे? आपल्या आसपासच्या व्यक्तींमधून जे शक्य तेवढे गुणग्रहण केले पाहिजे. मला वाटते, आमच्या मुलामुलींनी लोहचुंबकाप्रमाणे गुणचुंबक व्हावे.

विद्यालयाच्या प्रारंभापासून कार्यरत. गणित व विज्ञानाच्या शिक्षिका म्हणून काम.
सध्या माध्यमिक विभागाच्या साहाय्यक मुख्याध्यापक म्हणूनही कार्यरत.
भ्र. ध्वनी. ८२७५२९०७५८    jayashree.anandniketan@gmal.com

# जीवनशिक्षणाचे प्रयोग

योगिता गावंडे

मुले अनेकदा समजून न घेताच शिकतात. अभ्यास फार करतात पण त्यातून शिकणे होत नाही. न समजता शिकणे म्हणजे  शिक्षणाचे एक ओझे आपल्या मनावर आणि बुद्धीवर घेणेच आहे. काळाला अनुसरून शिक्षणात बदल घडवीत जावे लागते. खरे तर काळ बदलतो याचा अर्थ मानवी जीवनातच बदल घडून येतात आणि मानवी जीवन हेच शिक्षणाचे दिशादर्शक यंत्र असल्यामुळे ते शिक्षणाला आपल्याबरोबर बदलायला भाग पाडत असते. जसे जीवन तसे शिक्षण असावे लागते.

शिक्षणाचा जीवनाशी दुहेरी संबंध असतो. आजचे वास्तव जीवन हे शिक्षणाला इंधन पुरवीत असते आणि उद्याचे अपेक्षित जीवन हे शिक्षणाचे वळण ठरवीत असते. शिक्षणाची दिशा निश्चित करीत असते. मानवी जीवनाचे खास वैशिष्ट्य असे की ते प्रवाही असते. त्यामुळे प्रवाही असणे हेच शिक्षणाचे लक्षण ठरते. जीवनातील सर्वच अनुभव महत्त्वाचे असतात पण त्यातही लहान वयातील अनुभवांचे स्थान मानवी जीवनात विशेष असते त्यामुळे सुरुवातीच्या काळापासूनच शिक्षणाविषयी नेमकेपणाने विचार व्हायला हवा.

मेंदूमध्ये चेतापेशी असणे आणि त्यांची परस्पर जोडणी होणे एवढेच महत्त्वाचे नसते तर या चेतापेशींना उद्दीपित करून त्यांचा कृतीशील वापर केला नाही तर त्या पेशी निरुपयोगी होतात किंवा त्या दुसरी काही कार्ये अंगीकृत करतात. आपल्या मज्जासंस्थेमधील काही भाग अस्तित्वात नसेल तरीही लहान मुले जगू शकतात, कामे करू शकतात. परंतु जसजसे वय वाढते तसतशी मेंदूची लवचीकता कमी होत जाते त्यामुळे एकदा मंद झालेल्या अथवा नाहीशा झालेल्या क्षमतांना पूर्वपदावर आणणे कठीण होत जाते. म्हणूनच  वस्तुरूप जग हाताळून त्यांचा शोध घेऊन आणि सतत प्रश्न उपस्थित करून शिकणे उत्तम होते. ते कायम स्मृतीत राहते.

ज्ञानप्राप्तीसाठी साक्षरतेचे साधन अनिवार्य आहे. समोर वाढून आणलेले ज्ञान ग्रहण करणे एवढीच क्रिया विद्यार्थ्यांकडून अपेक्षित नसते या ज्ञानप्रक्रियेत त्याचा सहभाग असावा लागतो. या ज्ञान ग्रहण करण्याच्या क्षमता कशा वाढतील किंवा परिणामकारकतेने ज्ञान ग्रहण करण्याच्या पद्धती कोणत्या असू शकतील या संदर्भातील मनुष्याच्या मानसप्रक्रियेशी संबंधित क्षेत्रात संशोधन करणे आवश्यक आहे. परीक्षा, अभ्यासक्रम, उत्तीर्ण होण्यासाठी किमान गुणांची अपेक्षा या व्यावहारिक गोष्टींमुळे आपण विद्यार्थ्याने ज्ञानग्रहण किती करावे त्याच्यावरच मर्यादा घालीत आहोत. त्यामुळे तर ज्ञानप्राप्तीचा हा प्रत्यक्ष मार्ग दिवसेंदिवस निरुपयोगी ठरत आहे. मात्र ज्ञानप्राप्तीचा खरा मार्ग आपल्याला उपलब्ध आहे, तो म्हणजे अनुभवांतून शिकण्याचा मार्ग. त्यासाठी विद्यार्थ्याला अप्रत्यक्ष मार्गापेक्षा प्रत्यक्ष मार्ग अवलंबावा लागतो. ज्ञाननिर्मितीच्या प्रक्रियेत स्वतः सहभागी व्हावे लागते. प्रत्यक्ष कार्यातून अनुभव आणि अनुभवातून ज्ञान हा तो मार्ग असतो.

अशाच मार्गाचा उपयोग करून आम्ही आनंदनिकेतन विद्यालयामार्फत कार्यातून अनुभव आणि अनुभवातून ज्ञान कसे मिळेल याचा प्रयोग आम्ही करीत आहोत. हे काम करीत असताना मन, बुद्धी, शरीर यांचा मेळ साधला जातो. यासाठी आम्ही वेगवेगळे उपक्रम राबवितो. बागकाम, स्वयंपाक, वस्त्रकला (कताई, शिवणकाम), विज्ञान खेळणी तयार करणे इत्यादी. मन, बुद्धी, शरीर यांचा मेळ उपक्रमाच्या मदतीने कसा साध्य होतो याविषयी बागकाम हा उपक्रम आहे. त्यामध्ये मूळ काम करतो म्हणजे शरीराचा विकास होतो. काम कसे चांगले होईल यासाठी विचार करतो, निरीक्षण करतो, काही तंत्र-संकल्पना समजून घेतो. म्हणजे बुद्धीचा विकास होतो, त्याचप्रमाणे मूल शेतकऱ्याप्रती किंवा समाजातील व्यक्तींप्रती संवेदनशील बनते. पाचवीचे बागकाम घेत असताना आलेला अनुभव- विद्यार्थी काम करीत होते, त्यातील एक विद्यार्थिनी मला म्हणते, ताई किती उन लागते, सहन होत नाही पण मजूर दिवसभर शेतात कसे काम करत असतील? हा प्रश्न तिला पडला म्हणजे तिच्या मनावर काम होत आहे. अन्न आपल्यापर्यंत कसे येते याची त्यांना जाणीव होते.

शाळेत विविध उपक्रम चालतात त्यात विद्यार्थी नुसते सहभागी होत नाहीत तर ते त्यातून बऱ्याच गोष्टी शिकतात. कार्यातूनच मूल्यशिक्षण होते. मूल्यशिक्षणासाठी कार्य केले जात नाही. हे उपक्रम राबवीत असताना समता, बंधुता, स्वातंत्र्य, अभिव्यक्ती, लिंगभाव, वैज्ञानिक दृष्टिकोन या सर्व मूल्यांचा समावेश होतो. वेगवेगळ्या उपक्रमांच्या मदतीने विषयांच्या संकल्पना समृद्ध होण्यास बरीच मदत होते. इंग्रजी, मराठी, गणित, विज्ञान, भूगोल, इतिहास इत्यादी विषय या उपक्रमाच्या मदतीने मुलांना समजून सांगायला, त्यांना समजून घ्यायला खूप मदतरूप होते. खेळीमेळीच्या वातावरणात मुले वेगवेगळ्या संकल्पना समजून घेतात. भाषा समृद्ध होण्यासाठी हे उपक्रम मदत करतात. निबंधलेखन, कविता, व्याकरण समजून घ्यायला वाव आहे. विज्ञानातील वनस्पतीचे अवयव वर्गात समजून घेण्याएवजी बागेतून ते छान समजून घेता येतात. रासायनिक बदल, भौतिक बदल या संकल्पना विद्यार्थ्यांना वर्गात कळणार नाहीत पण स्वयंपाकामध्ये दही लावले, त्यानंतर 'दुधाचे दही लावले तसे दह्याचे पुन्हा दूध होईल का' याचे विद्यार्थी निरीक्षण करतात. त्यामुळे ती संकल्पना चांगली स्पष्ट होते.

अशाप्रकारच्या शिक्षणातून विद्यार्थी स्वावलंबी बनतो. पर्यावरणस्नेही विचार करतो. सामाजिक भान जागृत होते. विद्यार्थ्यांचा आत्मविश्वास वाढतो. वेगवेगळे कौशल्य विकसित होते. त्यांना ज्याचे अंग आहे ते कौशल्य विकसित होण्यास त्यांना संधी मिळते. आमच्या शाळेत चित्रकला, नृत्य, संगीत या कलांचा समावेश आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांना आपली कला जोपासण्यासाठी संधी मिळते. अशा सर्व अनुभवातून विद्यार्थी आपला सर्वांगीण विकास करण्यास संधी घेतो आणि त्यातून आपले जीवन समृद्ध होण्यास विचार करतो.

विद्यालयाच्या प्रारंभापासून कार्यरत. प्राथमिक विभागाच्या
साहाय्यक मुख्याध्यापक म्हणून सध्या कार्य करीत आहेत. यावर्षी इ. चौथीच्या
वर्ग शिक्षिका म्हणून काम करताना केलेले काम या लेखात दिलेले आहे.
भ्र. ध्वनी. ८८०५८४२०८४     jaimala.ansewagram@gmail.com

•••